प्रकाशक :
न. मा. कुलकर्णी,
प्रतिमा प्रकाशन,
औरंगाबाद

वेष्टनावरील चित्र श्री. दीनानाथ दलाल यांचें आहे.



किंमत तीन रुपये.

मुद्रक :
प. वि. बेलवलकर,
हरिहरेश्वर मुद्रणालय,
महाल, नागपूर.

## प्रकाशकाकडून—

प्रतिभा प्रकाशनाचें पाहिलें पुष्प, "रुद्रवीणा" वाचकांच्या हातीं देतांना आम्हांस अतिशय आनंद होत आहे. या संग्रहांत कवि कान्त यांची १९३० ते १९४७ पर्यंतची प्रसिद्ध व अप्रसिद्ध स्फुट कविता संग्रहित करण्यांत आली आहे.

या कार्यास अनेकांनीं अनेक प्रकारें सहाय्य केलें आहे. त्या सर्वांचा येथें नामनिर्देश करणें अशक्य आहे. ज्यांच्या आर्थिक सहाय्यावर व प्रोत्साहनावर आम्ही हातीं घेतलेलें कार्य पार पाडूं शकलों त्या सर्वांचे आम्ही अत्यंत ऋणि आहों.

श्री. प्रभाकर पाध्ये, संपादक 'नवशक्ति' यांनीं आमच्या विनंतीस मान देऊन, जी विवेचक व साक्षेपी प्रस्तावना लिहून दिली त्याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहे.

तसेंच श्री. ग. त्र्यं. माडखोलकर, संपादक 'तरुणभारत', यांनीं प्रस्तुत कार्यांत आमचें जें वेळोवेळीं मार्गदर्शन केलें, त्याबद्दल मी त्यांचा सदैव कृतज्ञ राहीन.

हरिहरेश्वर प्रिंटिंग प्रेसचे व्यवस्थापक, श्री. भाऊसाहेब बेलवलकर यांनी अल्पावधींत काव्यसंग्रहाचें मुद्रण करून दिल्याबद्दल आभार.

दिनांक: ९ ऑगस्ट १९४७
औरंगपुरा, औरंगाबाद.

न. मा. कुलकर्णी
व्यवस्थापक, प्रतिभा प्रकाशन.

## वेदि आणि वीणा—

थयथय नाचत येइ भैरवी, थयथय नाचत ये.
रिपुरुंडांची घाल भयानक गळ्यामधीं वलयें.
रक्ताच्या चिखलांतुन देवी, तांडव कर स्वैर.
कल्पांताचा धारण कर तूं गे रुद्राकार.
उज्ज्वल भवितव्यास्तव देवी त्रिभुवन जाळित ये,
थयथय नाचत येइ भैरवी, थयथय नाचत ये.

ही श्री. पोवळे यांची कविता मीं वाचली तेव्हां भैरवीचा साक्षात् थयथयाट असलेली कविता मराठींत—अर्थात् अलीकडच्या मराठींत—असेल असें मला वाटलें नव्हतें. पोवळ्यांनीं भैरवीला हें भयानक आवाहन करून सुद्धां स्वतः असें रौद्रभयानक, रुधिरार्चित काव्य, विशेष लक्षांत येईल असें लिहिलेलें नाहीं. कुसुमाग्रजांना रुधिराचें भय वाटत नसलें तरी त्यांच्या काव्यांत रक्तरंजनापेक्षां प्रकाशपूजनच विशेष आढळतें. 'जा जरा पूर्वेकडे' या कवितेंत रक्त, मांस आणि मढीं यांचा जो खच आहे तो अर्थात् निषेधात्मक आहे. श्री. निकुम्ब हेहि आजच्या अनेक कवींप्रमाणें उज्ज्वलेची आराधना करीत असले तरी त्यांची 'उज्ज्वला' रक्तपिपासु नसून मार्तंडाची नुसती निःश्वासिता आहे. शिवाय 'रुद्रास आवाहन' करणाऱ्या ताम्बे कवींप्रमाणेंच ती त्यांची स्वाभाविक प्रकृतिहि नाहीं. श्री. कान्त यांची 'रुद्रवीणा' वाचली तेव्हा मात्र त्यांच्या रुद्राराधनेंत भद्रकालीचा रक्तरंजित विलास आहे याचा तावडतोब प्रत्यय आला. त्यांचें 'नवें वर्ष' कसें प्रकटतें तेंच, उदाहरणार्थ, पाहा—

कंठीं नररुंडांच्या माळा
साम्राज्यांचें भस्म कपाळा
प्रेतावरती नाच मांडिला
ओल्या मानवचर्मांचें करिं निशाण फडकाविलें !

जिच्या कोमल गळ्यांतून नेहमीं चंद्रकिरणांची तान निघते अशा गायिकेला ते जें गाणें गायला सांगतात तें—

आशेनें जे गेले श्रमुनी
त्यांच्या थिजल्या त्या बुबुळांतुनि
तेज घेउनी येई कल्पना तेजाळित अस्मान
सणसण सुटती गोळ्या पवनीं
निरपराध ये रक्त उसळुनी
अरुण तयाचा गगनीं धांवे निर्माया दिनमान

या रक्तमय अवस्थेचें. जनतेच्या 'विराट जागरणा'च्या ज्या तेजाला त्यांनीं आपली कविता वाहिली आहे त्याचे वर्णन त्यांनीं असें केलें आहे—

तेज कशाचें ? लाल वारुणी सांद्र अरुण उजळलें
अर्धजागल्या पन्नगांशिरिंचे रत्नमणी झळकले
होमानलीं बलिचें काय रुधिर उसळलें
अज्ञात हुतात्मा-सरण कुठें धडकलें
त्याचाच निखारा का रसरसुनी फुले
विराट जनता जागे, घूर्णित नयन लाल उघडले

अर्थात् क्रान्तांचें हें रुधिरसिंचन एक प्रकारें प्रकाशपूजनाचाच भाग आहे. सुमंगल स्वातंत्र्याची उषा त्याच्यावर पसरलेली आहे. त्यांच्या एका हातात खड्ग असले तर दुसऱ्या हातात ' अमर ज्योत ' आहे. सत्तांधांचे नयन फोडण्यास ते आतुर असले तरी या नयनांतलें तेज घेऊन दीपकळी फुलविण्याची व तिच्या प्रकाशांत कवितेचें चरण लिहिण्याची त्यांची मनीषा आहे. दधीचींच्या अस्थींतील यज्ञाग्नींना त्यांचें आवाहन आहे—

चमकती तव अस्थितून
तेच अग्निकण अजून
जागविलि ज्योती ज्यांनीं सूर्यमालिकांची

वस्तुस्थिति अशी आहे कीं हा केवळ अग्निसंप्रदायहि नाहीं अगर निव्वळ रुधिरसंप्रदायहि नाहीं. तो यज्ञसंप्रदाय आहे—स्थंडिलसंप्रदाय आहे. जगाचा साक्षात्कार या कवींना धगधगलेल्या स्थंडिलासारखा होत असतो. सारें विश्वच त्यांना पेटलेलें दिसतें; विश्वांतील पंचमहाभुतें खवळून उठलीं आहेत; धरणी थरथर कांपत आहे; तेजाला शतसहस्र जिव्हा फुटल्या आहेत; वाऱ्याला उन्माद चढला आहे; सागराला उधाण आलें आहे; आणि सारें आकाश या धगधगत्या स्थंडिलानें उजळलें आहे—असें दृश्य त्यांच्या नजरेसमोर नाचत असतें. या प्रलयकालीं मानवाचें कर्तव्य कोणतें यावर या कवींनीं आपली दृष्टि केंद्रित केलेली आहे. कोपलेल्या यज्ञदेवतेला मानवानें आपली आहुति देऊन शांत केलें पाहिजे आणि भविष्यकालीन प्रसन्नतेची प्रभा निर्माण केली पाहिजे असा या ज्योतिर्मयी कवितेचा आदेश आहे. या कवितेचा यज्ञवेदीवर जन्म झालेला आहे आणि तेथील त्याग आणि तेज [illegible] रंगलेली आहे. यज्ञांत अग्नि असतो त्याप्रमाणें आहुतिहि असते—कुसुमाग्रज-पोवळ्यांनीं विशेषतः अग्नीची उपासना केली तर कान्तांच्या कवितेवर प्रामुख्यानें आहुतीचें रुधिरसिंचन आढळतें.

मराठी कवितेच्या एका विशिष्ट कालखंडांत [illegible] यज्ञसंप्रदाय प्रभावी ठरावा ही विचार करण्या[illegible]खी गोष्ट आहे. साधारणपणें १९३२ नंतर, १९३०–३२ च्या काय[illegible]च्या कालानंतर, हा संप्रदाय अस्तित्वांत आला असें म्हणायला हरकत ना[illegible]. ज्या कारणामुळें राष्ट्रसभेच्या राजकारणांत क्रांतिवादी समाजवाद्यांचा उदय झाला त्याच कारणांमुळें मराठी कवितेंत या यज्ञप्रवृत्तीचा उदय झाला असें म्हणतां येईल. हें खरोखर मराठी काव्याचें क्रान्तिपूजन आहे. या कालांत महाराष्ट्रामध्यें जें चैतन्ययुक्त क्रांतिकारक वातावरण सळसळत हो[illegible] (आणि आहे) त्याचा [illegible]ङ्मयीन आविष्कार आहे. मराठी काव्यांत हें क्रान्तिपूजन नवीन [illegible]त-धाम्यांच्या आत्मार्पणानें महाराष्ट्राचें अंतःकरण भारून टाकले [illegible]

सावरकर-गोविंदांच्या कवितेंत हें क्रान्तिपूजन झालें. पण त्याची प्रकृति आणि प्रेरणा निराळी होती. त्यांत परंपरेचें पुनरुज्जीवन होतें आणि प्राचीन संस्कृतीची आराधना होती. आजच्या क्रान्तिपूजेंत नवें विश्व उभविण्याची आकांक्षा आहे. जीवनाचें आकाश नव्या नक्षत्रांनीं मोहरून टाकण्याची इच्छा त्यांत आहे. जीवनाचा प्राणवायु नव्या ऋचा आणि नवीं सूक्तें यांनीं भारून टाकण्याची ईर्ष्या त्याची आहे. आणि जीवनाच्या दशदिशा नव्या दीप्तीनें उजळण्याची—नव्या रंगांचें इंद्रधनु उभारून त्याचें नवयुगास तोरण बांधण्याची आकांक्षा तें बाळगीत आहे.

गांधीजींच्या अहिंसायुगांत ही नवी कविता, यज्ञकुंडांतून देवता बाहेर यावी तशी आली हें ध्यानांत घेतलें म्हणजे महाराष्ट्राच्या वाङ्मयीन प्रकृतीचें थोडेसें उद्‌बोधक दर्शन होतें. गांधीजींनीं गुजराती वाङ्मयांत अहिंसायुग निर्माण केलें असें माहितगार सांगतात. ही कविता महाराष्ट्राच्या राजकारणांत गांधीवादी पक्षानें 'निर्वीरमुर्वीतल[illegible]' विजय संपादन केला होता त्या कालांत जन्माला आली. गांधीजींच्या स्वातंत्र्यकार्याला तिनें साथहि दिली. पण तिला अहिंसावादी कोण म्हणेल? महाराष्ट्रीय समाजवाद्याप्रमाणेंच तिची [illegible]कृति आहे असें म्हटलें असल्यास चालेल. समाजवाद्यांप्रमाणेंच गांधीजींच्या जीवनतत्त्वज्ञानाबद्दल [illegible]ला आत्मीयता नाहीं, पण गांधीजींच्या क्रांतिकार्याबद्दल तिला आकर्षण अ[illegible] गांधीजींचें तत्त्वज्ञान आणि समाजवाद्यांचें तत्त्वज्ञान याच्यांत फारसें साम्य [illegible] नाहींच, पण तीं तत्त्वज्ञानें तितकींशीं समांतर रेषेंतहि नाहींत. या दोन त[illegible]ज्ञानांत सुसंवाद साधण्याचा प्रयत्न आचार्य ज[illegible]डेकर प्रभृतींनीं मोठ्या निष्ठेनें केला, पण तो व्यवहारतः बराचसा असफल ठरला असेंच आज तरी [illegible]णावें लागेल. तरीहि समाजवादी पक्षाचा [illegible]कास गांधीजींच्या क्रांतिकार्याच्या छायेंत झालेला आहे आणि याची जा[illegible]च त्या पक्षानें १९४२ च्या क्रांतिकारक क्षणीं त्या युग-[illegible] नेत्यांच्या प्रकाशांतच आपलें कार्य करण्याचा प्रयत्न केला.

आजच्या या यशसांप्रदायिक कवितेचें स्वरूप पुष्कळांशीं असेंच आहे. १९३२ नंतर या कवितेचा विकास झाला आणि ऑगस्ट क्रांतींत ती उत्कर्षाला पोंचली. श्री. कुसुमाग्रज यांना १९३६ सालीं 'तेजार्णवीं नव पोहलों' असा आत्मप्रत्यय आला व त्यानंतर त्यांची कविता एका नवतेजानें प्रखर बनली. १९४२ च्या क्रांतिकालांत या तेजाचा नवोन्मेष 'चालली मेघांची सेना', 'व्यर्थ न हो बलिदान' यांसारख्या कवनांत दृष्टीस पडला. श्री. पांवळे यांच्या अग्निफुलांना याच काळांत विशेष बहर आला. श्री. कान्त हे मराठवाड्यांतले आहेत. त्यांची प्रतिभा तेथील परिस्थितीनें आंदोलित झालेली आहे.

क्रांतिदेवी, ये, विद्युच्चरणीं
तव नयनींची ठिणगी उडवुनि
असंतोष पेटवी जनमनीं
 तव अग्निपंख नभिं फडफडुं दे

असें आवाहन त्यांनीं १९३३ सालींच केलें, पण १९३८ सालीं हैद्राबाद संस्थानांतल्या प्रजेंत प्रतिकाराचें तेज संचरूं लागल्यावर त्यांचीं 'अमरज्योत', 'विराट जागरण', 'जयजयकार' यांसारखीं गीतें जन्मलीं आहेत. 'जयजयकार'मध्यें 'सत्याग्रह झुंझार' असा उल्लेख आहे. उस्मानिया विद्यापिठाच्या वीर विद्यार्थ्यांच्या 'वंदे मातरम्' सत्याग्रहास उद्देशून त्यांची एक कविता आहे. १९३८ सालीं रसरसून फुललेला हा निखारा पुढील काळांत मंदावला तर नाहीच, उलट उफाळून पेटला हें त्यांच्या 'नवें वर्ष' (१९४२), 'सांडितां कुणास्तव रुधिर तरी!' (१९४२*), 'गाशिल कां हें गान!' (१९४५), 'अग्निपथ' (१९४६), 'आश्रिया (१९४७) इत्यादि कवितांवरून दिसून येईल 'आश्रिया' काव्यांत तर त्यांनीं,

विफल कटांचा
क्रांतिकारकांच्या विजयघोषांचा नमीं कोलाहल
होई मेघनाद गंभीर भीषण
प्रगटे त्यांतून रुद्ररूपधारी
ऑगस्ट क्रांति ती!

असा स्पष्ट उल्लेख केलेला आहे.

गांधीयुगानें महाराष्ट्रांत कवींच्या दोन पिढ्या पाहिल्या. पहिली पिढी रविकिरणमंडळाची आणि दुसरी या स्थंडिल-संप्रदायाची. गांधीयुगाच्या क्रांतिगर्भ कार्याविरुद्ध या दोन पिढ्यांची प्रतिक्रिया मात्र अगदीं परस्पर-विरोधी झाली. तत्कालीन महाराष्ट्रीय मध्यमवर्गाप्रमाणे आणि त्याच्या अहंमन्य पुढाऱ्यांप्रमाणें रविकिरणमंडळाचे कवि गांधीवादी राजकारणाच्या संपर्कापासून शक्य तितके दूर राहिले. गांधीजींचें दुरून आलिप्त स्तवन करण्याच्या एकाद्या किरकोळ प्रकारापलीकडे या पंथानें त्यांच्या तेजस्वी कार्यास अधिक स्पर्श केला नाहीं. ही 'रविकिरणमंडळी' प्रायः स्वतःच्या सुखदुःखांचे आलापविलाप (अर्थात् कलात्मकतेनें) आळवीतच राहिली. सामाजिक सुधारणेचें प्रतिबिंब त्यांच्या काव्यांत अर्थात् अनेकदां पडलें—पण तें खरोखर प्रतिबिंबाचें प्रतिबिंब होतें. ज्या सामाजिक सुधारणांची गगन-भेदक तुतारी केशवसुतांनीं स्वप्राणानें फुंकली तिच्या प्रतिध्वनींचे पडसाद रविकिरणमंडळाच्या कवितेंत उमटले. उलटपक्षीं आजचे अग्निपंथीय कवि गांधीयुगांतील तेजस्वितेशीं शक्य तितकी समरसता साधण्याचा प्रयत्न करीत आहेत. एका दृष्टीनें हा केशवसुतांचाच वारसा आहे. केशवसुतांच्या कवितेंत सामाजिक सुधारणेचें जसें प्रबोधन आहे त्याप्रमाणेंच क्रांतिकारक बंडखोरीचाहि पुरस्कार आहे आणि तो त्यांच्या 'स्फूर्ति'सारख्या कवितांत आढळतो—

पद्यपंक्तीचीं तरफ आमुच्या करीं विधीनें दिली असे
टेंकुनि ती जनताशिर्पावरि जग उलथुन या देऊं कसें !
बंडाचा तो झेंडा उभवुनि धामधूम जिकडेतिकडे—
उडवुनि देऊनि जुलुमाचे या करूं पहा तुकडे तुकडे !

असा 'महादेव ! हरहर ! समराचा' केशवसुतांनीं केला — आणि आजचे क्रांतिवादी कवि 'पद्यपंक्तीच्या तरफे'चा उपयोग या आदेशानुकूल असाच करीत आहेत. मूर्तिभंजन हा आजच्या या यज्ञपूजक काव्याचा एक महान् विशेष आहे. कोणत्याहि मंगल कार्यास मूर्तिपूजनानें सुरवात होते, त्याप्रमाणें या काव्यास मूर्तिभंजनानें होते असें दिसतें. 'माझ्या जीवनाचा मीच शीलेदार' असा पुकार करुन हे 'बुत्‌शिकन' 'खंड खंड करिन आज या पुराणमूर्ति !' अशा निर्धारानें देवदेवतांच्या मूर्तीवर धावून जातात. यामूर्तिभंजनाचा उगम 'देवदानवां नरें निर्मिले' या केशवसुताच्या विचारसरणांत शोधायला हरकत नाही. श्री. कान्त यानीं केशवसुताकडून घेतलेली स्फूर्ति त्यांच्या 'पेटताहे', 'सरताहे', 'खंगताहे', 'गर्जताहे' वगैरे शब्दप्रयोगांपुरतीच मर्यादित नाहीं. त्यांच्या 'मूर्तिभंजक'वर केशवसुतांच्या 'मूर्तिभंजना'चा ठसा स्पष्ट दिसतो. केशवसुतांच्या 'मूर्तिभंजनां'त

मूर्ति फोडुनीयां देऊं जोडुनीयां
परी विकूनीयां टाकूं न त्या !
विकूनि टाकिती तेचि हरामखोर
तेचि खरे चोर आम्ही नव्हों !

असा जो विचार आहे त्याचाच अनुवाद श्री. कान्त यांच्या 'मूर्तिभंजकां'त आढळतो—

मूर्ति एकही न विकिन मृदु भोळ्या भावांना
हा न मूर्ति-विकेता पाप-पुण्यव्यापारी.

एके ठिकाणीं केशवसुतांच्या निसर्गविषयक 'वर्ड्स्वर्थिअन' दृष्टिकोनाचा अवलंब कान्तांनी केलेला आढळेल. भृंगाला उद्देशून केशवसुत म्हणतात—

भृंगा ! आणि तुझें गान
सृष्टीचें गमतें कवन !
गा ! तूं गा ! नादी भ्रमरा !
मी गणमात्रा जुळणारा !
'कवि' आम्हांलागुनि म्हणणें
कविशब्दार्था लोळविणें !
अस्मद्गान नव्हे 'गान'
तें गाना चिंध्यादान !
परंतु भृंगा ! तव गान
परमानंदें परिपूर्ण !

येथें भृंगावर सत्कवित्वाचा आरोप केशवसुतांनीं जसा केला आहे तसा सचित्रकलेचा आरोप कान्तानी झऱ्यावर केला आहे—

कलावंत तो, चित्रकार तो
झरा जळीं तव चित्र काढतो
चित्रकार अम्हि वृथा म्हणवितों
नवरंग खुले, पार भाव दडे !

आजच्या कवींवरचा केशवसुतांचा हा प्रभाव न्याहाळण्यासारखा आहे. केशवसुत हेच आधुनिक मराठी कवितेचे जनक आहेत हें सिद्ध करण्यासाठीं, त्यांनीं स्फुट भावगीतात्मक कविता लिहिली, अशा भावगीतास अनुरूप अशा मात्रावृत्तांचा पुष्कळसा उपयोग केला, लौकिक व सामाजिक विषयांना काव्यांत महत्त्वाचें स्थान दिलें, काव्याची उपासना साधनापेक्षां साध्याच्या दृष्टीनें केली आणि सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे काव्यांत आत्मलेखनाचें स्थान प्रस्थापित केलें वगैरे गोष्टी विद्वानांनीं दाखवून दिल्या आहेत. पण

आजच्या, अगदीं अद्यावत् कवितेचा क्रांतिकारक आत्माहि केशवसुतांच्या 'स्फूर्ति'सारख्या बंडखोर कवितानीं स्फुरलेला आहे हें विसरून चालणार नाहीं. मात्र केशवसुताचा हा प्रभाव पुष्कळ अंशीं अभावित आहे, असें म्हणता येईल.

अर्थात् या नव्या कवींची यांतली काव्यदृष्टि थोडी निराळी आहे. पूर्वीचे कवि सरस्वतीला, शारदेला, काव्यदेवीला आवाहन करीत. त्यांच्या काव्याचें सौंदर्य हें शारदेचें सौंदर्य, तिच्या मोराच्या पिसाऱ्याचें सौंदर्य, तिच्या वीणाझंकाराचें सौंदर्य असे. त्यांचें काव्य म्हणजे वाग्देवी शारदेचे मंत्र! 'शारदेनें जो मंत्र दिला कानीं, तसें लिहिलें मी;—काव्य तिचें मानीं' असें केशवसुतांनीं लिहिलें. 'शब्दांनो, मागुते या' या कवितेंत त्यांचें आवाहन शारदेसच आहे. आजच्या कवीची दृष्टि बदलली आहे. वाग्देवी ही एकाद्या तेजोदेवतेची दासी असावी अशी त्यांची भावना दिसते. या देवतेच्या शक्तीचा विलास आपल्या काव्यांत व्हावा असें त्यांना वाटते. या तेजोदेवतेस त्यांचें आवाहन आहे. १९२० सालीं कवि ताम्बे यानीं 'रुद्रास आवाहन' केलें आणि आजच्या कवींस ती कविता पुण्याहवाचनासारखी झाली आहे. आजच्या ज्योतिर्मयी कवितेची ती प्रधान आराधना आहे. कुसुमाग्रजांनीं 'ज्योतींतून धांवत या तेजःकण सारे' असें आवाहन केलें; पोवळ्यांनीं भैरवीला 'अग्नि चेतवीत, ध्वंस करीत ये' अशी प्रार्थना केली आणि निकुम्बांसारख्या कोमल कवीला सुद्धां—

आणि तेजोगर्भांतुनी तशा त्या
—यज्ञकुण्डांतुन द्रौपदी निघाली—
तसें अङ्गीं यावेंस लेउनी तूं—
अग्निसुमनें भूषणें दिव्य कांहीं

अशी आळवणी करण्याचा मोह आवरला नाहीं. काय सांगावें यापेक्षां कसें सांगावें या फडकेप्रणीत 'कलेसाठीं कले'च्या पेक्षां ही दृष्टि निराळी आहे

हें विस्तारानें विशद करण्याचें कारण नाहीं. अर्थात् काव्यनिर्मितीच्या कार्यांत निमग्न असतांना त्यांच्या कलात्मक वृत्तीनें त्यांच्या व्यक्तित्वाची पूर्ण पकड घेतली, जीवनानुभवांत ते कलात्मक वृत्तीनें निःशेष रंगले ही गोष्ट खरीच — नाहीतर त्यांची कविता कलापूर्ण उतरलीच नसती !

कान्तांनीं देखील क्रांतिदेवतेस मनःपूत आवाहन केलें आहे. तिच्या मंदिरांत त्यांनीं ध्येयमार्गीं झुंजणाऱ्यांच्या प्राणज्योतीचे दीप लावले आहेत; विराट जनाच्या घूर्णित नयनांतल्या रत्नमण्यांची तिला त्यांनीं माळ घातली आहे; असिपत्रांची पूजा बांधली आहे; कालशिरीं चालणाऱ्या तरुणांच्या रुधिराचें अर्घ्य दिलें आहे; 'यौवनविक्रमरसिं फेसाळलेल्या जीवनप्याल्या'चा नैवेद्य दाखविला आहे आणि अराजकांच्या अभिलापांचे तिच्यासाठीं मंत्र म्हटले आहेत. पण एवढ्यानें त्यांचें समाधान दिसत नाहीं. कान्तांच्या काव्याविषयींच्या कल्पना अधिक क्रांतिगर्भ दिसतात. कविता म्हणजे 'स्वप्नांचे पंख लावून फुलविलेला अंध पिसारा' नव्हे तर तो एक 'आत्माहुतीचा आविष्कार' असला पाहिजे अशी त्यांची निष्ठा दिसते. काव्यांतली भावना म्हणजे काय तर 'रक्ताची धारा' आणि अर्थ म्हणजे काय तर कवीचया दृष्टीच्या 'नवतेजाचा तारा', असा त्यांचा विश्वास आहे. ही भावना आणि हा अर्थ कवीच्या आत्मत्यागाच्या तेजांत न्हाऊन निघाला पाहिजे. या आत्मत्यागास कवीची तयारी नसेल तर त्याच्या शब्दाच्या विलासावर आम्ही विश्वास कसा ठेवावा असा त्यांचा सवाल आहे. म्हणून ते कवीस असें आव्हान देतात कीं,

कवे, दे, दे शब्दांचें मोल
निज तनुखंड तराजुंत ठेवुनि अपुली भाषा तोल.

कान्तांनी आपल्या काव्याचें अंबर रुधिरानें रंगविलें आहे. दिल्लीच्या लाल किल्ल्यामधील बागेंत जसें पाणी खेळविलेलें असे त्याप्रमाणें कान्तांनीं आपल्या शब्दपंक्तींत रक्त खेळाविलेलें आहे — इतकें कीं त्यांच्या या 'काव्यमय

रुधिराभिसरणा'ला कांहीं ठिकाणीं थोडीबहुत शाक्तपंथीय अवकळा प्राप्त झाली आहे. त्यांची कविता कंठीं नररुंडांच्या माळा घालून आणि हातीं ओल्या मानवचर्माचें निशाण धारण करून प्रेतांवर नाचत नाचत अनेकदां अवतरते. त्यांनीं आपल्या काव्यदेवतेच्या गळयांत थिजलेल्या बुबुळांची माळ अनेकवार घातली आहे आणि चितेची राख तिच्या कपाळाला अनेकदां फांसली आहे. ही त्यांची स्वाभाविक प्रकृति असेल असें मला वाटत नाहीं. किंबहुना रुधिरप्रीति ही सुद्धां त्यांची नैसर्गिक प्रवृत्ति नसावी आणि म्हणूनच त्यांची रक्तरंजित कविता पुष्कळदां शाक्तपंथीय उतरली आहे. जें कवीच्या प्रकृतींत नाहीं त्याचें अवडंबर त्यानें मांडलें कीं त्याची कविता चटकन् अतिरंजित आणि कृत्रिम होते आणि कान्तांच्या रक्तमयी कवितेचें अनेकदां असेंच झालें आहे. त्यांच्या या कवितेंत थिजलेलीं बुबुळें पुन्हा पुन्हां भेडसावतात, मानवचर्माचें निशाण वारंवार फडकतें आणि अस्थींतल्या अग्नीला विश्रांति मिळत नाहीं—कल्पनांच्या आणि भावनांच्या या बेसुमार पुनरुक्तींचें रहस्य त्यांच्या या अस्वाभाविक अवडंबरांत आहे असें मला वाटतें. कान्तांच्या कवितेंतील 'रुधिरप्रीति' स्वाभाविक नसल्यामुळेंच तिचे कांहीं विपरीत प्रकार दृष्टीस पडतात. उदाहरणार्थ, एका कवितेंत, ते एका अजाण बालकास, भविष्यकालाचा अरुण पाहण्यासाठीं आपली अंगुलि चिरून पाहण्यास सांगतात! या रक्ताच्या या काव्यमय हव्यासामुळेंच त्यांनीं 'पदरंजन' या मनोज्ञ भावगीतांत, रमणीच्या मृदुल पदाखालीं तरुण हृदय चिरडून त्याच्या रक्तानें तिचें पाऊल रंगण्याची विचित्र कल्पना मांडली आहे! ही रक्तमयी वृत्ति स्वाभाविक असती तर रुद्रभीषण कां होईना, पण निर्दोष कविता त्यांच्या लेखणींतून उतरली असती, पण कांतांची प्रकृति 'रक्तपिपासु' नसल्यामुळेंच, मला वाटतें, त्यांच्या रक्तरंजित काव्यांत कांहीं दोष निर्माण झाले आहेत. कांहीं कल्पनांची पुनरुक्ति, दग्ध अस्थींचें रणशिंग करण्याच्या कल्पनेसारख्या चुकीच्या कल्पना, चिद्घन चपलेला दिलेलें घणाचें रूप किंवा जुन्या

जगाची कुजकी दांडी 'लचवून' तोडण्याचा खटाटोप, यासारख्या भानगडी या अस्वाभाविकेंतूनच निर्माण झालेल्या दिसतात. असें असलें तरी कान्तांची काव्यप्रतिभा मधुनमधून प्रभावी ठरते आणि

हें मंदिर बांधलेंस
ती मशिद उभविलीस
लववितोस मान इथं मिटून नेत्र कां ?
कां न कळे उभविलेस आपुल्याच हातांनीं
तूंच पराजयस्तंभ आपुलेच तुंग तुंग बुद्धिशाली मानवा !

अशी तत्त्वदर्शक ओळ, किंवा

दीप जळे, मधु तेज विनरतें
शलभ जळे, तर, राखचि उरते
म्हणतो कोणी जीवन राखचि, म्हणे कुणी ती ज्वाला!

असा सुंदर विचार ते सहज लिहून जातात. शिवाय या सर्व कवितांत त्यांचा अपार आवेश भरून राहिलेला आहेच. या आवेशामुळेंच त्यांच्या या कवितेला ओजस्वी गति प्राप्त झालेली आहे.

आपल्या रुद्राराधनेमध्यें कान्तांनीं मधुर मदिर गीतें गाणाऱ्या मंजुळेला क्रांतीचें ध्वजगान गाण्याचा आदेश दिला आहे, पण मला स्वतःला त्यांचीं मधुर मदिर प्रणयगीतेंच अधिक आवडतात. त्यांच्या प्रतिभेचें मनोज्ञ दर्शन त्यांच्या 'वीणावती सुंदरीस' वाहिलेल्या प्रीति-पुष्पांतच होतें. त्यांच्या प्रतिभेच्या विलासाची विविधता आणि विलोलता या गीतांतच आढळते. येथें त्यांची प्रतिभा कधीं . शराबप्याल्यांतल्या प्रति-बिंबासारखी झळाळते तर कधीं विशाल तरूच्या घनगर्द साउलींतल्या प्रकाशचित्रांप्रमाणें ती स्मित करते. कधीं ती अर्धोन्मीलित पुष्पाभोंवतीं नाचणाऱ्या फूलपांखराप्रमाणें अर्धस्फुट भावनाभोंवतीं रेंगाळते तर कधीं सांद्र घनामध्यें लवलवणाऱ्या विजेप्रमाणें निराश विषण्ण प्रेमाचें हास्य

व्यक्त करते. दुखविलेल्या नागिणीच्या दंशाचें सामर्थ्य तिच्यांत केव्हां केव्हां आढळतें तर केव्हां केव्हां प्रियकरासाठीं पंखाची साउली करूं पाहणाऱ्या पक्षिणीची माया तिच्यांत प्रत्ययास येते. कित्येकदां तिच्यामध्यें स्वतःच्याच गायनानें धुंद झालेल्या कोकिळेची गानतृष्णा दिसून येते तर कांहीं कांहीं वेळां, नीलाकाशाच्या पार्श्वभूमीवर आपली धवल काया कशी दिसते हें जलाशयांतल्या प्रतिबिंबांत न्याहाळून पाहणाऱ्या राजहंसाची रंगलोलुपता तिच्यांत जाणवते. कधीं तिच्या नेत्रांत युगायुगाची आस डोकावते तर बहुतेक वेळां तिच्या उदास डोळ्यांत करुण विलासच दृष्टीस पडतो. स्वतः कान्तांनींच म्हटल्याप्रमाणें त्यांचीं प्रणयगीतें--

‘ कर मुक्त गीत चिरदुःखित हृदयाचें ’

या वृत्तीनें जन्माला आलेलीं आहेत; आणि अर्थात् Our sweetest songs are those that tell of saddest thoughts या न्यायानें तीं नितांतमधुर ठरलीं आहेत. या गीतांवर सफलतेच्या अरुण रंगापेक्षां विषण्णतेच्या निशाच्छायाच अधिक पसरलेल्या दिसतात. निराश व्याकुळार्त हृदयाचे उद्रेकच त्यांत अधिक आढळतात. कवीचें हृदयचित्र अपुरें आहे, मेंदीचे रंग पानांत दडलेले असतात त्याप्रमाणें त्याचे भाव हृदयांत दडलेले आहेत, आपलें मूक अकथित हृदय घेऊन तो इथें तिथें हिंडत आहे, आणि मिळेल तो क्षण कुसमित करण्याची अनिवार लालसा कधीं कधीं त्याला ग्रासून टाकीत असते. त्याच्या जीवनांत प्रतिसाद देणारें जीवाचें पांखरू कधींच आलें नाहीं असें नव्हे, पण--

आलीस उशिरां जीवनांत साजणी
वरदान त्यामुळें शाप तुझें जाहलें

अशी त्याची स्थिति झाली आहे. श्री. कान्तांचीं सारींच प्रेमगीतें असे निराश मनाचे मूक भाव नाहींत. कधीं कधीं निर्व्याज प्रसन्नतेंत ता नाहींत असतात. ‘ शेजारिणि, तूं हंसत राहा ’ त्या गीतांत, तिच्या

हास्यामुळें जीवन नाचत गात येत आहेसें त्यांना वाटतें. ' जागविलें ' हें तर प्रसन्न प्रेमपूर्तीचें गीत आहे. या गीतांत रात्रींच्या मिलनानंतर सकाळीं,

अतां उभी तूं नव सुमनापरि
घेउनिया फल बीज अंतरीं
दार लवे मम कल्पवल्लिनीं, फळें बनुनि क्षण टपटपले

अशी असीम तृप्ति पसरली आहे. पण एकंदरींत या प्रणयगीतांत गूढ एकलेपणींची हुरहूरच थरारतांना दिसते.

कान्तांच्या नायिका म्हणजे, प्रणयिनींच्या नेत्रांचे किरण, त्यांच्या नयनांत तरळणारीं स्वप्नें, पापण्यावर थरथरणाऱ्या स्मृति, त्यांच्या हास्याचा प्रकाश, त्यांचे मृदुल, रेशमी, कुरळ काळे केस, त्यांत चमकणारे सलिल तुषार, असफल मीलनतृषा इत्यादि सामुग्री घेऊन बनविलेल्या मूर्ति होत.

दीर्घ बदामी श्यामल डोळे
एक सांद्रघनस्वप्न पसरलें
' धूपछांव 'मधीं यौवन खेळे

अशी त्यांची शेजारीण, किंवा

ओढ्यामधूनि कळशी भरूनी
घेतांना शिरिं अंग तोलुनि

अशी मीनाक्षी अथवा,

हातीं पूजाताट डोले, चंदेरीची सळसळ
कांपे ज्वानीच्या वाऱ्यानें चांदण्याचें केळफुल

अशी घाटावरची युवती—या कान्तांच्या प्रणयिनी अविस्मरणीय आहेत. विशेषत: त्यांचे ' मुलायम ' नयन आणि मधुर हास्य यांनीं त्यांच्या गीतांवर विलक्षण मोहिनी पसरलेली आहे. हें अर्थात् साहजिक आहे. रमणीचे नेत्र म्हणजे तिच्या अंत:करणाचे रत्नदीप. प्रकाशानें रत्नें प्रकाशतात त्याप्रमाणें प्रीतीनें तिचे नेत्र उजळतात. आपल्या प्रीतीचें सारें वैभव ती

नेत्रावाटे व्यक्त करते. स्त्रीच्या प्रीतीचें विश्व तिच्या नेत्रांतून उमलते. अंतरंगांत डोलणाऱ्या नावाचे प्रतिबिंब तिच्या डोळ्यांत उमटते. उद्यानांतील फुलावरच्या दंवबिंदूंत साऱ्या उद्यानाची शोभा प्रतिबिंबित होते त्याप्रमाणें रमणीच्या नेत्रांत तिच्या प्रणयी जीवनाची सारी शोभा प्रतिबिंबित होते कान्तांनीं या शोभेचें वर्णन ठिकठिकाणी केलें आहे. उदाहरणार्थ—

अथांग तव शर्बती लोचनें
क्षितिज हंसे जणुं पिउनि चांदणें

आणि

झुरे बावरे मुरके डोळे
पलकांच्या छायांत तळपलें
स्वप्न एक मधिं झळकुनि गेलें
चंचल जललहरींना बुजुनी मन काय परतले ग

स्त्रीच्या नेत्राप्रमाणें तिचें स्मित सुद्धां एक सजीव स्वप्न आहे. रमणीच्या नेत्र किरणांनीं रोमांचित होणारी कान्तांची लेखणी या स्मिताची उपेक्षा कशी करील ! ' शेजारिणि तूं हंसत राहा ' या गीतांत ते म्हणतात,

सहज मधुर तूं हंसतां वळुनि
स्मितकिरणीं धरि क्षितिज तोलुनि

त्यांच्या जीवनाचें सारें क्षितिजच जणुं त्या हास्यानें उजळलें होतें !

कान्तांचीं प्रेमगीतें ताम्बेयांच्या प्रेमगीतांप्रमाणें मुलायम आहेत. ताम्बेयांच्या गीतांतलें भावार्त लालित्य त्यांत आहे, त्याचप्रमाणें तांबेयांच्या प्रेमकाव्यांतलें मध्ययुगीन वातावरणहि आहे. एक रात्र राहून जाणारा प्रवासी प्रेमी, कळशी घेऊन पाण्यावर जाणारी नायिका, पदरंजनासारख्या प्रसाधनात रमणारी रमणी इत्यादिकांची चित्रें येथेंहि आढळतात. यांत अर्थात् आश्चर्य नाहीं. ताम्बे जसे उज्जैन–ग्वाल्हेरच्या मध्ययुगीन परिसरांत वाढले तसे कान्त हैद्राबादच्या मध्ययुगीन वातावरणांत वाढलेले आहेत. पण मराठवाड्यातील

पाश्चात्त्यांचा एक विशेष परिणाम कान्तांच्या प्रणयगीतांवर झालेला दिसतो. लावणीवाङ्मयांतील गहिऱ्या प्रमाण प्रीतीच्या छटा त्यांच्यावर उमटलेल्या आहेत. ताम्ब्यांचें भावातें लालित्य आणि लावणी वाङ्मयातली गहिरी प्रीत यांच्या कलात्मक संगमामुळें कान्तांच्या प्रेमकाव्याला वैशिष्ट्य प्राप्त झालें आहे आणि त्यांच्या लेखणींतून, तें तुझेंच गाणें ग, त्या तरूतळीं विसरलें गीत, ये पूर्ण कराया चित्र मडे, शेजारिणि तूं हंसत रहा, आलीस उशिरां, रमणी उदविशीं निज कचभार, पदरंजन, मोगरा फुलें तो थाव, जागविलें, नयन मुलायम हललें ग, मेंदीचीं पानें, घाटावर, अशीं सुंदर भावगीतें उतरलीं आहेत.

परभणीचे श्री. बी. रघुनाथ यांनीं युगवाणींतल्या आपल्या मनोज्ञ व्यक्तिचित्रात म्हटल्याप्रमाणें राजहंसाच्या चाऱ्यासारखे वेचक, अर्थवाही, अनुप्रासगर्भ आणि नादमय शब्द कान्तांच्या कवितेंत आढळतात. सायं-काळच्या संध्यारंगांनी ढग रंगावे तसे प्रतिभाविलासानें त्यांचे शब्द रंगलेले आहेत. धरा आणि ज्योत्स्ना यांचें मीलन होतें तसा शब्द आणि भावना यांचा संगम त्यांच्या कवितांत होतो. त्यांची शब्दांची निवड प्रत्येक ठिकाणीं समर्पक ठरली असती ( आर्द्र स्मिताऐवजीं भिजट स्मितासारखे प्रयोग मुळींच आढळले नसते ) तर या कवितांचें माधुर्य विशेष वाढलें असतें. पण ही कसर त्यांनीं सुंदर कल्पनांची पखरण करून भरून काढली आहे. स्वच्छसुंदर जलाशयावर मनोहर लहरी पसराव्या तशा त्यांच्या काव्यांत मनोहर कल्पना पसरलेल्या आहेत—

विशाल तरु तरी फांदी लवली
थंडगार घनगर्द साउली
मनिंचीं अस्फुट स्मितें झळकतीं तसे कवडसे तींत (पृ. ७७)

तुझीं नखक्षतें, रात्रीं माझ्या उरीं फुलें झालीं (पृ. ११६)

मांसें मांडिलीं स्वरूपहाटीं
प्रीतीचीं आम्हि मठीं कोरलीं भवतिं श्वानमुंकार (पृ. ११७)
मृत्यूनंतर तुझ्या पथावर
उन्हांत छाया करिन तुजवरी होऊनि न कळत घार (पृ. ११८)

या कल्पनांप्रमाणेंच कान्तांच्या कवितेंत इतस्ततः विखुरलेली चित्ररम्य आणि कल्पनाकुसुमित शब्दचित्रें न्याहाळण्यासारखीं आहेत.

कोण प्रदक्षिणा करी नदीपारीं, कडे तान्हें
सुगी धरणीबाईची लखडली मोतियानें (पृ. ११५)

जणुं अधरबिंब! अर्धाच चंद्र वर आला
गिरितळांतुनी अंधार सांचला हलला
जळजळत उसळलें काळकूट तें क्षितिजीं
प्यायास काय तें अधर शिवाचा लवला! (पृ. १२२)

निष्पर्ण नाचती शाखा, चांफा डोले
जणुं दग्ध अनंगचि अस्थिशेष हा हाले!
जंव शाखाशिखरीं फुलें फुलतीं एकेक
प्रीतिचें अपर्णा तप तें कुसुमित झालें! (पृ. १२४(

आणि

ताजमहालाचे सुंदर मीनार
आरस्पानी ते--
कुण्या प्रेमीकांचे हिमगौर बाहु
कृष अस्थिशेष
चिर पसरले आलिंगनासाठीं
अनंत नभांत कांपती हालती! (पृ. ६७)

श्री. कान्त यांची कविता भावनार्त आहे. आणि म्हणूनच ती मला मोलाची वाटते. विचारप्रधान कवितेला रूपकासारख्या कसल्या तरी

कल्पतीचा आश्रय करावा लागतो यांतच भावनाप्रधान काव्याचें श्रेष्ठत्व दिसून येईल. पण कान्तांच्या काव्याला विचाराची हौस नाही असें नाही. त्यांच्या कांही रुबाया पोवळ्यांच्या रुबायांइतक्याच विचारप्रधान आहेत. 'मी शब्दांमधुनि निर्मिन नव आकाश' हा उद्दंड आत्मविश्वासहि पोवळ्यांची आठवण करून देतो. कदाचित दोघांनीहि तो केशवसुतांकडून घेतला असेल! पण कान्तांचा आत्मविश्वास अधिक विनीत आहे असें त्यांच्या 'तुम्हि-अम्ही गाइली मिळुनि' या रुबाईवरून वाटतें. कान्तांनीं विचारप्रधान कविता लिहिल्या आहेत त्या प्रमाणें 'पाषाण आणि मूर्तिकार' यासारख्या कवितेंत त्यांनीं कल्पकतापूर्ण चमत्कृतिहि साधलेली आहे. 'औरंगझेबाची कबर आणि मराठवाड्यातली धूळ' यांमधल्या संवादाची चमत्कृतिहि लक्षणीय आहे. वेश्येच्या मनाचीं जी दोन परस्पर विरोधीं दर्शनें त्यांनीं रंगविलीं आहेत तीं त्यांच्या नाट्यमय प्रतिभेचीं उदाहरणें म्हणतां येतील. परंपरेच्या त्यागांत ज्याना काव्यसाफल्य वाटतें, 'नेत्रदीपक' नवीनता हा ज्यांना काव्याचा प्राण वाटतो, स्वदेशी आणि परदेशी कल्पनांची कलमें बांधण्यात ज्यांची कलमबहादुरी दंग झालेली आहे त्यांना कान्तांच्या कवितेंत कांही विशेष न आढळण्याचा संभव आहे. पण साधा सहृदय रसिक कान्तांच्या प्रेमकाव्यावर खूष होईल असे मला वाटतें.

अभिजात कवि हा अभिजात रसिक असतो. त्याची रसिकता दिक्कालांचीं बंधनें ओळखीत नाहीं. काहीं अलिकडच्या कवींची भाषा वापरून असें म्हणतां येईल कीं, तो 'युगायुगांचा रसिक' असतो. अभिजात वाङ्मय हें सुद्धा 'युगायुगांचें वाङ्मय' असतें. लोकवाङ्मय हा या वाङ्मयाचा विशेष जीवंत प्रकार होय. अभिजात कवींची नजर या वाङ्मयाचा वेध घेते—त्यांतून प्रेरणा मिळविते. श्री. कान्त यांनीं मराठवाड्यांतील लोकवाङ्मयांतून स्फूर्ति घेतलेली दिसते—आणि स्थंडिलसंप्रदायाच्या कवींत यांचें हें वैशिष्ट्य दिसतें. 'दुंदुभि आमुच्या बनवा', 'खंजिरी', 'अजिंठ्याच्या दाराशीं',

आणि 'रागोद्धार' या कवितांत कान्तांची ही 'युगींयुगींची रसिकता' कुसुमित झाली आहे. राणी दुर्गावतीच्या समाधीजवळ तिच्या रणदुंदुभी देखील दगड होऊन पडल्या आहेत, त्या शिला रोज रात्रीं शेजारून जाणाऱ्या वाटसरूंना आर्तस्वरानें काय सांगतात; देगांवच्या पाटलानें एका हरिणाची शिकार करून त्याच्या कातड्याची खंजिरी बनविली आणि त्या नव्या खंजिरीच्या साथींत आपल्या गढीवर नाचरंग मांडला तेव्हां त्या हरिणाची प्रिया तेथें येऊन आक्रंदून काय बोलली; पारिजातकाच्या फुलांमुळें आजिंठ्याच्या चित्रकलेचें रक्षण झालें असें म्हणतात, या फुलांतून अमर मानवी रसिकताच कलेच्या रक्षणासाठीं संचार करीत असावी, या संरक्षक देवतेच्या मनांत कोणते विचार येत असतील; शंखतीर्थाच्या एका प्रसिद्ध गायकाचें गाणें त्याच्या पत्नीनें कधींच ऐकलें नव्हतें, तिनें पुष्कळ विनविलें पण त्यानें मनावर घेतलें नाहीं, नंतर एकाएकीं ती निवर्तली, मग त्या गायकानें मरणानंतर तिची इच्छा कशी पूर्ण केली—यांविषयींचा कान्तांचा कल्पनाविलास या कवितांत आढळतो. 'सदरा', 'जा पिउनि घोटभर पाणी', 'आली मधुरजनि' आणि 'मी नाचत नाचत आलें' या कविता सुद्धां याच जातीच्या आहेत असें म्हणतां येईल.

श्री. कान्त हे मराठवाड्यांतील कवि आहेत. साहजिकच त्यांच्या मराठी भाषा आणि महाराष्ट्रभूमि यांविषयींच्या अभिमानाला एक धार प्राप्त झालेली आहे. त्यांचा हा धारदार अभिमान 'अक्षरें तुम्हाविण कोण करिल वज्राचीं ?' 'तुज बोलवी देवगिरी', आणि 'मायभाषेस' या कवितांत व्यक्त झाला आहे. 'मायभाषेस' या कवितेंत ते म्हणतात,

माझे, मराठे तुझे पुत्र आम्ही तुझी मूर्ति ना नामरूपावते
गाणीं तुझा गायक्या, पूजकाचें हृदीं रक्त हेलावतें वाहतें
बंदी अशा गायनालें करोनी गळे आमुचे कापिले हे तरी—
घातील गाणीं मराठी कबंधें मराठी खुल्या माळरानावरी.

कान्तांच्या काव्यरचनेमार्गे जीवनानुभवाची जितकी प्रेरणा आहे तितकाच हा ज्वलन्त अभिमान आहे असें दिसतें. या अभिमानामुळें हीं कवनें रसिकास सादर करण्याचा हक्क तर त्यांना आहेच, पण त्यांच्या 'फटत्कारां'—तला पक्षी पारध्यास म्हणतो त्याप्रमाणे ते टीकाकारासहि म्हणूं शकतील कीं—

घेउनि रुतला बाण स्वांतीं
धुळींत पडतांपडतां अंतीं
एक तान फेंकीन, तुला ती—
खचित करिल बेभान पारध्या, सूंसूं सुटूं दे बाण !

२९-६-४७
दादर, मुंबई.

———

रुद्रास—

नेत्रानलिं करुनी त्रैलोक्याची होळी
अन्याय-असमता रगडित पायांखालीं
कर तांडव रुद्रा, विराट विश्वचितेंत
किंकाटत खचतां परि रविमाला खालीं
हांसवी स्वप्न नव पार्वति अरुण कपोलीं !

# मूर्तिभंजक

जाति-भृंगावर्तनी स्वैर

खंड खंड करिन आज सर्व दिव्य मूर्ति
करि चिद्घनचपलावण
वस्तुजात हें भंगिन
युगयुगिच्या शेंदरल्या कल्पकोटि ह्या आकृति
चूर चूर करिन मी १

मंदिर हें मुक्त करा,
द्वारपाल, उगि न मरा,
पूजकगण, दूर सरा
भिंत खचे, द्वार फुटे, श्रद्धेसह अंधानों,
अडसरही भंगती खंड खंड करिन अतां
सर्व देवमूर्ति २

घाव किती चुकविताल,
काय काय वाचवाल
झांकुनिया कृष्णगूढ भूतकाल-संपुटांत ?
भंवतिं बघा, चूर उडे दिक्कालांचा ! ३

मानवांस तुडवुनिया,
रक्त-मांस-चिखल करुन,
बसविल्यात धर्ममूर्ति त्या खूनी मातीच्या
चपल-भाव-पीठावरि;
रडवुनिया दुबळ्यांना
अश्रुंतून निर्मिलीत नीतिदेवी पंकजा;
अन्नाविण तडफडले
पथिं सडसडुनी मेले
घालुनि माळा त्यांच्या, थिजलेल्या बुबुळांच्या
नाचतात मंदिरांत कोटि कोटि देवमूर्ति !
पूजा यांचीच करा बळि देउनि आम्हांला
लावा माथ्यास टिळा आमुच्याच रक्ताचा !
हें न घडे ! ४

पंथ पुढति किति पांथा, बघ अपार पसरला
कां परंतु थांबलास ?
तूं इथेच श्रांतलास ?

वाटेच्या पत्थरास ठेंचाळुनि, अडखळुनी पडशि काय ?—
तोच दगड आणि काय पूजेस्तव मांडिला !
आर्चिलेंस ऊष्णऊष्ण मानवरुधिरांनीं;
हें भोळें रक्त तुला शेंदुर कां वाटत ?
धिक् पंगू मानवा ! ५.

हें मंदिर बांधिलेस,
तीं मशीद उभविलीस,
लववितोस मान इथें मिटुन नेत्र कां
कां न कळे उभविलेस आपुल्याच हातांनीं
तूंच पराजयस्तंभ आपुलेच तुंग तुंग
बुद्धिशाली मानवा ! ६.

छिन्न छिन्न करिन आज मूर्ति या सुपूजिता
शकलें तीं फेकिन अन् दाहि दिशां
मूर्ति एकही न विकिन मृदु भोळ्या भावांना
हा न मूर्ति-विक्रेता पाप-पुण्य-व्यापारी
क्रूर मूर्तिभंजक मी ! ७.

घणावरी घण घालिन
हें असीम दिग्बंधन फोडुनिया,
धड धड धड कोसळवीन जीर्ण दुर्गभिंतींपरि
कृष्ण रात्रिसम पुराण काळचें वज्रपटल

चूर्ण करिन घाव-घणीं
स्वर्मंदिर— !
स्वप्नदीप— !
यज्ञवेदि, राजदंड— !
काय टिकें मी बघतों, दिक्कालांच्या भंजनिं—
या दुर्धर घाव-घणीं
खंड खंड करिन आज या पुराणमूर्ति !! ८

बुधवेल, १·६·४०

## अमरज्योत

जाति—वारुणी

वज्र अस्थींचें दधीचि निर्मितां संग्रामकालीं
दिव्य ठिणग्या ज्या उडाल्या ज्योत त्यांची पेटताहे ! १

साहुनी अन्याय-मारा गाळिल्या ज्या अश्रुधारा
त्यांत जो दावाग्नि जागे ज्योत त्याची पेटताहे ! २

अर्धपोटी कीं उपाशी कष्टती कंगाल देशी
दाविला जो जाळ त्यांनीं ज्योत त्याची पेटताहे ! ३

ध्येयमार्गी झुंजतांना बंधनें विध्वंसितांना
प्राणज्योती ज्या विझाल्या ज्योत त्यांची पेटताहे ! ४

निजामाबाद (रेल्वे स्टेशन), ५-२-३८

## विराट् जागरण

जाति–स्नेहसागर

खारा वारा हेमंताचा दाहकपणिं झुळझुळे
भुजंगमाच्या स्पर्शी शीतल जहर-लहर जळजळे
कधिं देशसेवकां कड्याहुनी लोटिलें
अन् रक्त तयांचें युगें दरिंत गोठलें
ये वाहत वितळत आतां मंदानिलें
विराट जन दे आळस, सोडी श्वास त्रस्त गांजले
खारा वारा हेमंताचा दाहकपणिं झुळझुळे १

शब्द कशाचा ? काय खणखणे ? कोंदुन अंबर उले
धराकंपघर्घरींत भीषण घनगर्जन मिसळलें
कां दिग्गजघंटा होय चूर्ण भंगुनी
वज्रसें पुरातन कालकवच फोडुनी
ये नवयुग जन्मा क्रांतिशिंग फुंकुनी
विराट जन हुंकारे, त्याची बेडी ही खळखळे !
शब्द कशाचा ? काय खणखणे ? कोंदुन अंबर उले २

तेज कशाचें? लाल वारुणी सांद्र अरुण उजळले
अर्धजागल्या पन्नगशिरिंचे रत्नमणी झळकले
होमानलिं बळिंचें काय रुधिर उसळलें
अज्ञात हुतात्मा-स्मरण कुठें धडकलें
त्याचाच निखारा का रसरसुनी फुले
विराट जनता जागे, घूर्णित नयन लाल उघडले
तेज कशाचें ? लाल वारुणी ? सांद्र अरुण उजळले ३

बघ गरुडांच्या पंखाघातें स्वर्ग काय हदरतो ?
तांडव चाले कां रुद्राचें ? प्रलय-डमरु वाजतो।
राहिले तृषार्तचि भागीरथि निर्मुनी।
अन्नाविण मेले जे सोनें पिकवुनी
सत्तेविण पडले धुळींत रण झुंजुनी
प्रतिकार-ध्वनि त्यांचा गर्जे, विराट जन जागतो।
बघ गरुडाच्या पंखाघातें स्वर्ग अतां हदरतो ! ४

भुसावळ, २१-११-३८

## तारुण्य-संगीत

अभंग

वाळतात ओढे वाळतील सिंधु
तुफान रुधिरीं नवें चढे १
विझतात दीप विझतील सूर्य
माझ्या नेत्रीं तेज प्रज्वलित २
आपले सांडले सांगाती पांगले
एकटा मी चाले कालशिरीं ३
नसेल चाकरी नसेना भाकरी
भूक आहे परी सर्वंकष ४
आयु संपताहे देह खंगताहे
प्राण परी जागे देशोदेशीं ५
नसे सत्ता, नाहीं स्वातंत्र्य कशाचें ?
पुरे, मनीं नाचे बंडखोरी ! ६

बुधवेल, ६-५-३८

## नवें वर्ष

वर्ष नवें प्रकटलें
आज हें वर्ष नवें प्रकटलें
प्रकटत असतां स्वर्गधरेचे सात ताळ हदरले
वाहटुळी घोंघावत फिरती
स्तंभ धुळीचे गगन वेंघती
पिकलीं पानें मधिं आक्रोशति
जुन्या जगाचे बंध आमुच्या देंठांसह उपटले !
आज हें वर्ष नवें प्रकटलें १

तोफांचा गडगडाट झाला
पश्चिमेस अन् पूर्व दिशेला
घोरंदर रणयज्ञ भडकला
समुद्र उकळे, शिसें नभाचें त्या आगित वितळलें !
आज हें वर्ष नवें प्रकटलें २

रणधुमाळिची धूळ मुखावर
पोट रितें, प्रक्षुब्ध हृदंतर
नेसुनिया असिपत्र भयंकर
विराट तृष्णेंतुन संहारक संवत्सर उगवलें
आज हें वर्ष नवें प्रकटलें ३

कंठीं नररुंडांच्या माळा
साम्राज्यांचें भस्म कपाळा
प्रेतांवरती नाच मांडिला
ओल्या मानवचर्माचें करिं निशाण फडकाविलें !
आज हें वर्ष नवें प्रकटलें ४

अपलक नेत्रीं ज्वाळा फुलती
धूर लोळ केसांतुनि उठती
निश्वासीं बारूद पेटती
स्फोटक कुलपी गोळे झलित युद्धदेव पातले !
आज हें वर्ष नवें प्रकटले ५

ये नव वर्षा, प्रलय करित चल,
नगरें, राज्यें नांगरीत चल,
शिरें बळींचीं अन् पेरित चल,
मानवतेचें पीक नवें ये उद्या, सुगी ती साधे बळें !
आज हें वर्ष नवें प्रकटलें. ६

बुधवेल, २२-३-४२

## गुन्हेगार

जाति–प्रणयप्रभा

सोडणार कां हो मज इथुनी ?
द्या सजा आणखी वाढवुनी !

गुन्हा एकदां घडला, केला
कलंक त्याचा माथां बसला
तो पुसता ये तुम्हां, न काळा !

मुक्तींत अर्थ मग काय जनीं ?
द्या सजा आणखी वाढवुनी !

चोरी केली ज्यांच्याकरितां
ओळखतिल नच तेही आतां
लाजतील मम नांव जोडितां

मी कैदी, नच माणूस कुणी !
द्या सजा आणखी वाढवुनी !

गुन्हेगार जगिं कुणीं निर्मिला ?
प्रमाद पहिला न जयें क्षमिला,
शिक्षेसाठीं तुरुंग रचिला
माणुसकी आमुची हिरावुनी !
द्या सजा आणखी वाढवुनी !

प्रकाश मजला जग नाकारिल !
छाया-शांती तिथली जाळील !
बसली जागा ठावहि सोडिल !
लागतील दारें मज बघुनी !
द्या सजा आणखी वाढवुनी !

बरी प्रभावळ ही पापांची
सोबत सारी अपराधांची !
पाप न येथें पापा जाची
दुष्कर्मभार निज विसरोनी !
द्या सजा आणखी वाढवुनी !

भिंतींनों, मज कुशींत दडवा,
थंड शिळांनों, अंकीं निजवा,
बेड्यांनों, गाऊन जोजवा,
जग-वारा पडुं द्या नच चुकुनी !
द्या सजा आणखी वाढवुनी !

नांदेड, १८-५-३३

## सदरा

[ राखी पौर्णिमेच्या दिवशीं बहिणीनें आपल्या हातच्या शिवलेल्या सदऱ्याचें वाण भावाला द्यावयाचा प्रघात उत्तर हिंदुस्थानांत आहे. त्यानें भावाचें आयुष्य वाढतें, असा समज आहे. फांशीच्या तक्तावर उभ्या असलेल्या आपल्या भावासाठीं सदरा शिवणाऱ्या प्रेमळ बहिणीच्या मनांतल्या तुफानाची कल्पना कोण करूं शकेल ? ]

तुज असो औक्ष हें युगायुगांचें, भाई
अमृतें नाहुनी घटका घटका येई
छळितात दूत तुज जुलमी परसत्तेचे
सोरच भुकेले पशु भंवती प्राणाचे
वळितात तुरुंगीं दोर तुझ्या फांसाचे
परि कुशल चिंतिते घरीं आपुली आई
तुज असो औक्ष हें युगायुगांचें, भाई १

रात्रींत पुशित मी डोळे निज पदरानें
शिविला रे, सदरा हा अपुल्या हातानें
मृदु कवच फुटेल न हें अत्याचारानें
भारिलें सूत हें प्रिय आशीर्वचनांहीं
तुज असो औक्ष हें युगायुगांचें, भाई २

परि वाण तुज कसें हें माझें पोंचेल?
नच अंतिम आशा फांसावर पुसतील?
कां सदराहि न तुज ते घालूं देतील?
या तंतुतंतुंतुनीं भगिनिहृदय हें गाई
तुज असो औक्ष हें युगायुगांचें, भाई ३

या बलोद्धतांना दया न शिवली कांहीं
तव यज्ञ पाहुनी प्रभुही द्रवला नाहीं
तरि सदरा हा तव अंगीं जोंवर राही
तव प्राणहरण—छे! शक्य न देवांनाही
तुज असो औक्ष हें युगायुगांचें भाई ४

हैदराबाद, १३-९-३४

## अक्षरें तुम्हाविण कोण करिल वज्राचीं ?

जाति—दाक्षकन्या

येतांच नाथ, ती
        कावड श्रीखंड्याची
जलभरणी होते
        प्रतिवरसीं हौदाची
परि रितेंच जीवन
        सोंर दग्ध-उन्हाळा !
ही तहान सांगा
        केव्हां संपायाची ?

*    *    *

या नाथ, सारुनी
        मृदु पुष्पांची शाल
अजुनिही तप्त रणिं
        रडतें अंत्यज बाळ
अमृतस्नात कर
        बुद्धदयेचा तुमचा—
येउं द्या खालती
        ओलांडुनि दिक्काल

*    *    *

अश्वत्थमुळ्यांचा

गळा लागतां फांस

केलेत मुक्त तुम्हि

नाथ, ज्ञानदेवास

अक्षरें तुम्हाविण

कोण करिल वज्राचीं ?

प्रिय मायबोलिचें

बंधन तोडायास

*　　*　　*

शब्दांस रुजवुनी

या राकट काळींत

बसलांत अमृतें

नाथ, त्यास शिंपीत

शककर्ते गेले

तरिही आज अजून

ही फुले मराठी

नवीं युगें फुलवीत

पैठण, ८-१० ४६

## गाशिल कां हें गान ?

जाति—अंजनि

सखे, तूं गाशिल कां हें गान ?
गळा कोवळा तुझा मंजुळे, चंद्रकिरण जणुं तान
मधुर मदिर तूं गीत गाइलें
पंछि मनोनीडांत जागले
व्यथित चक्रवाकांपरि घाली हृदय प्रीतिला आण
असें ऐकिलें गान १

रूप-यौवनीं स्फुरे कल्पना
शब्द फुटति मधु कळ्यांफुलांना
आलिंगनपाशापरि होती भावबंध निर्माण
असें ऐकिलें गान २

× × ×

इथें न ती तारुण्य नव्हाळी
सर्व भुकेची आग भडकली
आसुड उडती, वाजति बेड्या, क्रंदे भूमि वितान
सखे, तूं गाशिल कां हें गान ? ३

गरल दर्प फूत्कार फणींचे
कुंड धगधगे मनिं सूडाचें
शब्द-निखारे ते खवखवती, हृदयीं धूर भयाण
सखे, तूं गाशिल कां हें गान ? ४

देशास्तव वनवासी झाले
न्यायास्तव फांसावर चढले
अराजकांच्या अभिलापांचें घुमतें येथ तुफान
सखे, तूं गाशिल कां हें गान ? ५

आशेनें जे गेले श्रमुनी
त्यांच्या थिजल्या त्या बुबुळांतुनि
तेज घेउनी येई कल्पना तेजाळित अस्मान
सखे, तूं गाशिल कां हें गान ? ६

सणसण सुटता गोळ्या पवनीं
निरपराध ये रक्त उसळुनी
अरुण तयाचा गगनीं धांवे निर्माया दिनमान
सखे, तूं गाशिल कां हें गान ? ७

अडवूं जुलुमाचे रणगाडे
शिशु लोटिति निज तनुसांगाडे
त्यांच्या पिचल्या मऊ हाडांचें या ओळिंत आव्हान
सखे, तूं गाशिल कां हें गान ? ८

बलशाली साम्राज्यें खचतीं
दलित करें दिक्काल बदलती
त्या समराचें, त्या क्रांतीचें स्फुरे इथें ध्वजगान
सखे, तूं गाशिल कां हें गान ? ९

लज्जारूपा विवस्त्र केलें
यौवन-वस्त्राचि फाडुनि लुटिलें
त्या लज्जेचे रंग वाहती जळतचि रक्तसमान
सखे, तूं गाशिल कां हें गान ? १०

त्रिनेत्र तांडव करितो ज्या क्षणिं
झरे शशिसुधा, धडके अग्नि
त्या नाट्याचा अर्थ धराया शब्दपंक्ति गतिमान
सखे, तूं गाशिल कां हें गान ? ११

औरंगाबाद, १५-१२-४५

## एक संवाद

शार्दूल विक्रीडित

मराठवाड्यांतील धूळ—

भाले तोडित फाडित ध्वजपटां फोडीत सिंहासनां
उत्पातापरि पातलास वरुनी ध्वंसूं महाराष्ट्र हा
मातीला मिळवावयास झटला स्वातंत्र्य येथील तूं
सम्राटा ! तिथल्याच धूळिंत पहा आतां स्वयें लोळशी

औरंगजेबाची कबर—

लोळें मातिंत मी, परंतु पणती ज्योती त्रिझाल्यावरी
माझा देह पडे सुशांत 'सिजदा' अल्लास केल्यावरी
आलमगीरचि 'तुर्बतींतहि' अजीं साम्राज्य मी भोगिलें
दासांचे उरलांत दासचि तुम्ही येथें मला हें सलें !

खुलदाबाद, १-१-४१

# पुढचें चरण

जाति–शुभवदना

रात जागवील
कुठवरती दीप तुझी रात जागवील
सूर्यतेजही न पुरें
म्हणुनि भंवतिं रात्र उरे
क्षितिजांतिल चंद्रकोर अवस बघ गिळील ! १

स्नेह ओतिशील किती
रक्तधारही कमती ! —
अधिकाचि थरथरूनि ज्योत दिशा काजळील ! २

म्हण, तिमिरांताचि कवना
दान माग नच किरणा
अंधारांतुनि तारा तुजशिं हांसतील ! ३

फोडुनि सत्तांध नयन
दीपकळी दे फुलवुन
त्या प्रकाशिं लिहिं पुढचें चरण स्फुरणशील ! ४

# मुकेची आग

जाति—मुद्रिका

का कलावंत साजणा, स्तब्ध तूं असा ?
रसहीन मेघ कष्टानें क्षितिजास टेकला जसा
तव भावस्वर मनिं अजुन मधुन उमटती
ढग-जडावल्या क्षितिजांत श्रावणी विजा चमकती
अर्धेच, चतुरा, तुझें गान थांबलें
पोळले भाव नजरेंत सावळुनि तेज मंदलें
रसिकतेस दुर्दम गान-तृषा लागली
निज पुरे टिपुस ओलावा झरूं देना गीतावली

* * * *

मज, रसिका, ही कासया फुका विनवणी
अंतरीं उमाळे जाती—जाउंदे सुखें करपुनी
माझीच नसे ही सर्व कलांची गति
सहकला कलावन्तांची पडतसे नित्य आहुति.
तुज न दिसे, नवल्या जीवा, कुंड पेटलें
मज दिसें—दिसें कां—त्याचें चाटून जाळ चालले
बघ चित्रकारांचीं चित्रें तीं पेटलीं
रंगवून निज रुधिरानें आगींत आज हीं मिळीं !
सोसून घाव अंतरीं मूर्ति घडविली
चारुता शिल्पकारांची त्या धगींत हा ! तडकली
शाहीर-अधरीं येउनी शब्द जों हंसे
तों करपुन त्याचे झाले बघ करांत हे कोळसे !
पोटांत भुकेची आग जधीं पेटते
व्यापून हृदय चौफेर ती उभी गगन चाटिते
नी निवेल कशि काळजी अशी दिननिशीं
अर्ध्याच गाइल्या ओळी, परि रहा तयांवर खुपी
पोटांत भुकेची आग जधीं पेटते
जाळून कलासंगीत ती उभी गगन चाटिते !

नांदेड, ३०-९-३३

# फितुर

जाति–प्रणवप्रभा

चावून दुज्याला मी मरतों
माझेंच घटघटा रक्त पितों
स्वार्थाला मी दुजे बळि दिलें
भूत परि न तें तृप्त जाहलें
मागी माझा घांस तें बळें
त्या तृप्त अतां ऐसें करितों
माझेंच घटघटा रक्त पितों १

माझें विष मम अंगीं भिनलें
त्या आगींत मी रातदिन जळें
अश्रूंतहि दावाग्न भडकले
गतकाल उभा पाठिस, गिळितो
माझेंच घटघटा रक्त पितों २

जेथिल प्यालों दूध तुझें मी
त्या हृदयाला केलें जखमी
आई, तव क्षतरक्त पिताांने मी
अतृप्त पिशाच्चाचें जगिं फिरतों
माझेंच घटघटा रक्त पितों ३

खुशाल आतां जळूं द्या मजला
क्षमे, न सिंची निज अश्रुजलां
आई, आवर तूं ममतेला
जाळिता जगा अग्निहि जळतो
माझेंच घटघटा रक्त पितों ४.

मम फितुरीनें निष्पापांचें
रक्त सांडलें जें भावांचें
उद्यांच उजळिल कडे तमाचे
मी आज तमीं यापरि बुडतों
माझेंच घटघटा रक्त पितों ५.

असेंच मजला सडुं द्या येथें
गृध्रांनों, स्पर्शा न तनूतें
गळतिल तुमचे पंखाचि उडते !
हा फितुर इथें कुजुनी मरतों
माझेंच घटघटा रक्त पितों ६.

नांदेड, १८-६-३२

## पहा अंगुलि चिरून

छंद–देवीवर

पाहतोस काय शून्यीं शून्य नजर लावून
शब्द गंभीर गर्जतो काय ऐक नसांतून
रवि, अरुण कशाला आकाशाचें विसंबण ?
स्वर्णगर्भ रम्य दिन निर्मू आपला आपण !
पहा अंगुलि चिरून तुझ्या रक्त बिंदूतून
असे सख्या रे, झोंपला तुझा उद्यांचा अरुण !
जागवाया त्यास रोज माझें गायन चाललें;
त्याच आरक्त प्रकाशा माझे नेत्र आसावले
नव्या नव्या तेजोन्मेषीं विश्व फुलेल नवीन
परी जाईन तेव्हां मी तुझें क्षितिज सोडून.
माझा दिन मावळेल, माझीं फुलें कोमतील,
रसरसलेलीं गाणीं तीहि तेव्हां वीटतील,
परि आठवी एवढें कुणी गेलासे गाऊन :
होता अरुण झोपला तुझ्या रक्तबिंदूतून !

भुषवेल, एप्रिल ३७

## तुज बोलवि देवगिरी

जाति–श्यामाराणी

चल रे, तुज बोलवि देवगिरि
यादव-गरूडध्वज पालवितो नभिं तरुणारुणपटांतरीं
गोलगोपुरें–मंत्रती डोंगर
स्वप्नांचा थर नीळ तयांवर
त्या स्वप्नांना हंसवूं फुलवूं वदवुं उमलत्या कळ्यांपरी
चल रे, तुज बोलवि देवगिरि १

काळी माती हीच येथली
जिचीं बाहुलीं भैरव बनलीं
हूण बर्बरा जिंकुनि जयगुढि जयें उभविली घरोघरीं
चल रे, तुज बोलवि देवगिरि २

ज्ञानेशाचें पाउल पहिलें
रविबिंबासम इथें उमटलें
तेज सुधा जिंकण्या पैज करि अजुनि धूळ या पथावरी
चल रे, तुज बोलवि देवगिरि ३

महाद्वार हें देवगिरीचें
इथें चर्म त्या हरपालाचें
लटकुनि सडलें, गळलें, गेलें, वीज जागवित दिगंतरीं
चल रे, तुज बोलवि देवगिरि ४

कथा सोलल्या ह्या कातडिची
गाणीं पिळिल्या ह्या आंतडिचीं
गाऊं ऐकूं, नवयुग-दुंदुभि गर्जतील हे बनुनि गिरि
चल रे, तुज बोलवि देवगिरि ५

जालना ते औरंगाबाद

## जन्मठेप

चाल—आरती श्रीरामायणजीकी

आई, नमितों श्यामल चरणीं
अंतरती जे मज घडिघडिनीं !

निघतां माते, पाउल नुचलें
प्रिय भूमिंत जणुं दडुनी रुतलें,
पाश पदीं परि जे करकचले

ओढिती फरफर तुजपासोनी
आई, नमितों श्यामल चरणीं !

'बोट' सागरीं निघे भरारा
वेलावायू हा तव खारा
चोरुनि येऊनि आंत शरीरा

निवर्वी, प्रेमळ श्वासच जननी !
आई, नमितो श्यामल चरणीं !

काळें पाणी पुढें खळखळें,
विषार पवनी लहर सळसळें,
पैलतटावर मरणाचि बसलें

क्षितिजीं भीपण ढग पांघरुनी !
आई, नमितों श्यामल चरणीं !

राख न माझी पडेल येथें,
तव दशन मग कसलें घडतें !
म्हणुनि मातृभू, ही सांगातें

नेतो मंगल माती इथुनी,
आई, नमितों श्यामल चरणीं !

आशा वांछा एकचि चित्तीं,
मित्रांना शत्रूंना विनति
मातृभूमिची मुठभर माती

मरतां पदरीं द्या बांधोनी !
आई, नमितों श्यामल चरणीं !

नांदेड, १७-५-३३

## प्रकाश

जाति–अवनि

चाल, चाल, अंधारांतचि, चाल एकटाची
पाहशील कुठवर तरुणा, वाट प्रकाशाची ?
दीप, सोबती कुणी न
तम तुफान ये उठून
जणुं हरील दृष्टि-प्राण आज एकदांची १

कंटक वा शूल तेथ
जरि पथांत रोविलेंत
भीति येथुनी कशास भावि संकटांची ? २

दमन, दैन्य हें बघून
मन रडेल पिळवटून
अश्रुनें परी न विझव ज्योत तूं मनाची ३

चमकति तव अस्थितून
तेच अग्निकण अजून
जागविली ज्योती ज्यांनीं सूर्यमालिकांची ! ४

श्रवुन पीडिताक्रंदन
धुपुं दे तव हृदय तरुण
वाट तें प्रकाशिल तुझी जाळ पेटत्याची ! ५

हैद्राबाद, २५-९-३४

## सांडितां कुणास्तव रुधिर तरी ?

जाति—श्यामाराणी

सांडितां कुणास्तव रुधिर तरी
उष्ण अर्घ्य अर्पितां कुणाला ? देव न उरले धरेवरी.
यौवनविक्रमरसिं फेसळला
रसरस तुमचा जीवनप्याला—
क्षितिजीं अमृतघन जणुं लवला !—
दगड शेंदरी निज रक्तानें अजुनि लेपितां कोठवरी ?
सांडितां कुणास्तव रुधिर तरी ? १

मंत्र, गीत तुम्हि स्वातंत्र्याचें
जयजयकारच लोकशक्तिचे
स्वप्न अमर तुम्हि तारुण्याचें
बंदिघराची भिंत उभवितां कां निज हाडांनींच परी ?
सांडितां कुणास्तव रुधिर तरी ? २

अमुच्या अस्थिशिरांच्या केल्या
घोर फिरंगी लोहशृंखला,
फितुरांनीं त्या पायीं ठोकिल्या
तोडा त्या बेड्या नि उडूं द्या ठिणग्या लोहांतून वरी
सांडितां कुणास्तव रुधिर तरी ? ३

पहा कापिलें शिर 'तात्या'चें
नमिं आव्हानित अजुनी नाचें
तुटले बाहू 'गोकलखां' चे
उभे दिशांतुनि तडफड करिती खड्ग धरूं देशार्थ करीं
सांडितां कुणास्तव रुधिर तरी ? ४

'नाना'ची तनु 'तराई'तुनी
उठे थडथडत हिंवतापानीं
पुसे कुणास्तव तुम्ही उभे रणिं
जळत्या गंजींतूनि विचारी 'लक्ष्मी' ज्वालामय नजरीं
सांडितां कुणास्तव रुधिर तरी ? ५

खंडित शस्त्रें परजायाला
अस्थि ठेवुनी 'मंडाले'ला
'शाहे जफर' तो वृद्ध आंधळा
पुत्रशवांना शोधित फिरतो, काठीविण धडपड कबरीं
सांडितां कुणास्तव रुधिर तरी ? ६

चघाळित बसलां तुकडे कसले ?
पहा रोटिवरि काय कोरिलें ?
‘ तुम्हि शतकांचे गुलाम सगळे ’
फेंका तुकडे, पोट उपाशीं गडगडुं द्या घनतडिद्स्वरीं
सांडितां कुणास्तव रुधिर तरी ? ७

कुठें निघल्या फौजा तुमच्या ?
‘ कैवाराला मानवतेच्या ’
गुलामांस अधिकार न त्याचा
तोडा आधीं अपुल्या बेड्या, माय उपाशीं मरत घरा
द्या अर्घ्य तिला द्या निज रुधिरीं
सांडितां कुणास्तव रुधिर तरी ? ८

हैद्राबाद, २१-२-४२

# अपुला पंथ निराळा !

जाति—स्मर

अपुला पंथ निराळा साजणि,
सुमनचयन हें कशास मार्गी ? रचिल्या आंसव-माळा !
सुखसदनीं नच आम्हां रमणें
नच हास्याच्या उन्हांत फिरणें
'कांट्यांच्या अणिवरच्या' गांवीं जाणें भाग आम्हांला
अपुला पंथ निराळा ! १

अंबर रंगें प्रकाश-किरणीं
तापुनि तडके अंतरिं धरणी
विषण्ण क्षितिजीं, झिरपत झुरते खिन्न ग्रीष्मघनमाळ
अपुला पंथ निराळा ! २

सुख न पसरि पथिं घडी फुलांची
कीर्त करि न साउली उन्हाची
मृत्यूनंतर स्वर्गसुखाची ना स्वप्निल पडशाळा
अपुला पंथ निराळा ! ३

आग सुरेंतुनि जी धगधगते
अश्रुमधुनि जी दया टिबकते
मिश्रण त्यांचें अपुल्या रुधिरीं उसळत बलिदानाला
अपुला पंथ निराळा ! ४

दीप जळे, मधु तेज वितरतें
शलभ जळे, तर, राखचि उरते
म्हणतो कोणी जीवन राखचि, म्हणे कुणी ती ज्वाला !
अपुला पंथ निराळा ! ५

बुधवेल, २८-२-३९

# जयजयकार

जाति–कोकिला

अखंड जयजयकार   करूं या अखंड जयजयकार
दलितांचें रणशिंग गर्जतें असंतोष–टंकार
धन्य आज दिन ! भीती सुटली
प्रभा नवी रविबिंबा चढली
त्यागक्रांति ज्योतींत प्रगटली
जळतां शलभ अपार   करूं या अखंड जयजयकार   १

या दिवसाची आशा अपुली
युगांयुगांतुन जी दडपियली
फोडुन कालकटोह उफळली
देत समर-हुंकार   करूं या अखंड जयजयकार   २

अडवितील नच तुरुंगार्गला
बांधितील नच अतां शृंखला
उभा असे जनरुद्र कोपला
तोडून बंधन पार करूं या अखंड जयजयकार

अस्थांताच यज्ञाग्न जागला
भिडति नभीं होमाच्या ज्वाला
वृद्धतरुण आहुतीस सजला
सत्याग्रांह झंजार करूं या अखंड जयजयकार

राज्यधरांनों, कुठली सत्ता
रुधिरमालिन ती अमुची मत्ता
मदें हंसा नच बालिच्या रक्ता
फुलें सजल अंगार करूं या अखंड जयजयकार

जुक्वेल, नोव्हेंबर ३८

## निर्भय गान

[ 'वंदेमातरम्' हें गीत गाण्याच्या जन्मजात अधिकाराच्या संरक्षणार्थ तेजस्वी लढा चालविणाऱ्या उस्मानिया विद्यापीठाच्या वीर विद्यार्थ्यांस— ]

जाति–अंजनी

गा, गा, निर्भय गान,
सख्यांनों, गा, गा, निर्भय गान
स्वातंत्र्याच्या मंत्रोच्चारीं भरूं द्या नभोवितान
व्यथित दिसे प्रकटाया भुवनीं
नव पहाट ती तुमच्या नयनीं
नसनसांतुनि पराक्रमाची खवळे लाट उधाण
सख्यांनों, गा, गा, निर्भय गान 1

गाणें गा, तें मातृभक्तिचें
पूजन-मंत्रचि निज मातेचे
भिजुनि रुधिरिं स्वातंत्र्यऋचा ती होय दिव्य निर्माण
सख्यांनों, गा, गा, निर्भय गान २

या गाण्याला कोण थांबविल
वज्र न त्याचें अक्षर मोडिल
मातृदुग्ध कां पिउन विसरलिस सत्ते, भूल भयाण !
सख्यांनों, गा, गा, निर्भय गान ३

भरुन अंगिं दमनाचे वारे
निखळा गगनामधले तारे
हृदयज्योती मग ह्या विझवा उठवुन जुलुम–तुफान
सख्यांनों, गा, गा, निर्भय गान ४

बुधवेल, ३१-१२-३८

## हें माझें जीवनगीत

जाति—स्मर

हें माझें जीवनगीत
बाल्य हास्यसम विखरूनि गेलें
क्षण कांक्षांनीं ज्वलित जहालें
अन् अश्रूपरि यौवन आलें आर्द्रपणीं जाळीत
हें माझें जीवनगीत १

ज्योतीभंवतीं फिरलों फिरलों
शापित शलभापरि तडफडलों
अपुल्या राखेमधींच निजलों, पोटीं धग निववीत
हें माझें जीवनगीत २

कधीं स्वरापरि मी झंकरलों
पवनाघातीं तोंच भंगलों
गाणें झालों किंवा उरलों पुसूं कुणां गरदींत ?
हें माझें जीवनगीत ३

मी रुधिरें नच उषा रंगविलि
श्रृंखला न पायिंची तोडिली
स्वप्न बंदिच्या मनिंचें मी, जें तुटें जुटें रातींत
हें माझें जीवनगीत ४

उषेमधिं तुम्ही, निशेपलिकडे
मी संध्येच्या अजुन अलिकडे
येऊं कसा हें धूमिल अंतर काळाचें तोडीत ?
हें माझें जीवनगीत ५

किरण आजच्या नयनांमधले
स्फुरण आजच्या हृदयांमधलें
या निश्वासीं कसें पोचवूं म्हणुनी हृदय व्यथीत !
हें माझें जीवनगीत ६

उन्हें आजचीं तुम्हां न दिसतिल
फुलें आजचीं तुम्हां न मिळतिल
ऊब, गंध, हे ठेवुं केंवि मी, भरुनि शब्दपंक्तींत !
हें माझें जीवनगीत ७

बुधवेल, २६-१०-३९

## अरुणतरुणसंगीत

जाति—कोकिला

अरुणतरुणसंगीत गाउं या अरुणतरुणसंगीत
स्वरभावांचें लास्य पुरें, वरूं कराल तांडवरीत
रसरसणाऱ्या तरुण हृदयिंच्या—
बेगुमान मद्मस्त धडकिचा
ताल द्या तुम्ही या गाण्याला आत्मार्पण-धुंदींत
गाउं या अरुणतरुणसंगीत. १

दुर्बल मनिंचें रडुनी रडुनी
गाणें थिजलें जें अश्रूंनीं
तुफान हृदयें पुन्हा खवळवूं चला गोठलें गीत
गाउं या अरुणतरुणसंगीत २

भाव न शोधा पुष्पकेसरीं
अनंततेच्या किंवा कुहरीं
पिळलेल्या अंतड्यांचा घुमवा नादशब्द-पंक्तींत
गाउं या अरुणतरुणसंगीत ३

श्रृंगाराचे दीप मालवा
चलनू पुरनटनाच थांबवा
युद्धीं खचल्या प्रेतांसंगें रडे मानवी प्रीत
गाउं या अरुणतरुणसंगीत ४

नकोत शीतल सुधाशर्करी
नको रवि, जरी जीवन वितरी
जाळूं आधीं दलित भीत जग असंतोष-ठिणगींत
गाउं या अरुणतरुणसंगीत ५

तुफान चढतें हृदयीं रुधिरीं
नवयुग जागें उन्मद नजरीं
जुन्या जगाची कुजकी दांडी तोडूं क्षणिं लवकरीत !
गाउं या अरुणतरुणसंगीत ६

बुधवेल, २०-५-३८

# दुंदुभी आमुच्या बनवा

[ राणी दुर्गावतीच्या समाधीजवळ तिच्या रणदुंदुभी देखील दगड होऊन पडल्या आहेत. त्या शिला रोज रात्रीं येणाऱ्या जाणाऱ्या वाटसरूंना गर्जून बोलावतात, असें म्हणतात. त्या शिलांचें तें आव्हान असेंच असणार, नाहीं कां ? ]

जाति–भूपती व उद्धव मिश्र

"रण फिरुनी एकदां लढवा
दुंदुभी आमुच्या बनवा
कुणि या हो, आम्हां बलिचर्मानें मढवा
दुर्गावति गेली इथें समर लढवून
ही तिची समाधि स्फुंदे रात्रींतून
रणभेरि अम्हि तिच्या पडलों दगड बनून
या हौस आमुची पुरवा दुंदुभी आमुच्या बनवा १

दुमदुमवुनि पूर्वी दिक्कालहि भेरीनें
लढविलीं कबंधें रणीं क्रांति-घोषानें
श्रृंखला गळाल्या केवळ पडसादानें
युगनाद आज तो घुमवा दुंदुभी आमुच्या बनवा २

आव्हान रणाचें तें दुर्दम ऐकून
खणखणलीं खड्गें कवळ्या गवतांतून
सणसणून सुटल्या गोळ्या मातीमधुन
पाण्यांत पेटला वणवा  दुंदुभी आमुच्या बनवा ३

रणचंडी झाल्या रमणी त्या नादांनीं
नभ तोलुनि धरिलें, कोसळतां भाल्यांनीं
फडकले ‘दुपेटे’ ध्वजांवरी ज्वालांनीं
तें निशाण फिरुनी चढवा  दुंदुभी आमुच्या बनवा ४

बंदींनों, घडवा वज्रें निज बेड्यांची
श्रीरामें केली स्पर्शें रमणि शिळेची
तुम्हि भद्रकालि या करा आज दगडाची
प्रलयाचे पडघम सजवा  दुंदुभी आमुच्या बनवा ५

जातात पथिक किति रात्रीं रानांतून
परि हांक शिळांची कुणी न घे ऐकून
घोंघावे वारा, उल्का पडती तुटुन
कुजबुजति पांथ ‘हा चवका’  “दुंदुभी आमुच्या बनवा” ६

औरंगाबाद, ११-१२-४५

# मानवास

[ राजकवि यशवन्त यांच्या 'कुंपणास' या कवितेस उत्तर ]

जाति—शुभवदना

कुंपणास पुसशिं काय जाशिं केधवां रे ?
परशु तुझ्या हातांमधिं
अग्नि तुझ्या नेत्रांमधिं
खळखळोनिया नसांत रक्त उसळतां रे !
कुंपणास पुसशिं काय जाशिं केधवां रे ? १

पारतंत्र्य छेदाया
निर्दळण्या अन्याया
तूं स्वतंत्र नी अजिंक्य मनुज जन्मला रे !
कुंपणास पुसशिं काय जाशिं केधवां रे ? २

नच लवशीं तूं दमनीं
स्थिर म्हणुनी नभधरणी
सागरास तूंच कांठ आंखुनी दिला रे !
कुंपणास पुसशि काय जाशिं केधवां रे ? ३

निश्वसनीं तव तुफान
घाव निशाणास हाण
प्राण प्रज्वलित करुनि चुडे पेटवा रे !
कुंपणास पुसशि काय जाशिं केधवां रे ? ४

वाऱ्याची वाट नको
नशिबाची मोट नको
येथुनीच कुंपणास जाळुं आज या रे !
कुंपणास पुसशि काय जाशिं केधवां रे ? ५

कांट्यांवर तनु पडतां
चिरुनि चिंधड्या होतां
स्वातंत्र्यध्वज दिगंति फडकतील सारे !
कुंपणास पुसशि काय जाशिं केधवां रे ? ६

हैद्राबाद, १९-९-४१

# कवीस आव्हान

जाति—लवंगलता

दे शद्वांचें मोल
कवे, दे, दे शद्वांचें मोल
निज तनखंड तराजुंत ठेवुनि, अपुली भाषा तोल
कवे, दे, दे शद्वांचें मोल

नसे भावना, ती खळखळती तव रक्ताची धारा
अर्थ कशाचा ? तुझ्या दृष्टिच्या नवतेजाचा तारा
आत्माहुति दे त्यासाठीं, मग ध्येयवाणि निज बोल
कवे, दे, दे शद्वांचें मोल

तूं स्वप्नांचें पंख लावुनी फुलव न अंध पिसारा
तुझी उद्याची दिव्य कल्पना जळता आज निखारा
घरकुल अपुलें उधळुनि, नंतर बदल काळ भूगोल
कवे, दे, दे शद्वांचें मोल

कसा ठेवणें नातरि आम्ही तव शब्दीं विश्वास
काय दाउनि नव्या जगाचा मधुमंथर आभास
ध्येयासाठीं रक्त सांड, ती नव कविता अनमोल
कवे, दे, दे शद्वांचें मोल

हैद्राबाद, १७-९-४३

# अग्निपंख नभिं फडफडुं दे !

जाति—नववधू

तव अग्निपंख नभिं फडफडुं दे
निजलेल्या दटका उठव बसुं दे
तुफानवाता वेडी पडली
वीज ढगांतुनि स्वस्थ झोंपली
गगनधरेला जडता खिळली
त्या प्रलय-घनांना कडकडुं दे
तव अग्निपंख नभिं फडफडुं दे  १

आंत शांत जरि दिसते जगतीं
युद्ध-वैर-लाव्हारस कढती
धराकंपनीं आग फुटुनि ती
चल तुनाट जग हें तडतडुं दे
तव अग्निपंख नभिं फडफडुं दे  २

माणुसकीहुनि आत्म टळले
देव देवळांतून भटकले
न्यायावर उकिरडे माजले
हे जाळ, अग्निगिरि धडधडुं दे
तव अग्निपंख नभिं फडफडुं दे ३

क्रांतिदेवि, ये, विद्युच्चरणीं
तव नयनींची ठिणगी उडवुनि
असंतोष पेटवी जनमनीं
मग जुलुम कितिहि वर गडगडुं दे
तव अग्निपंख नभिं फडफडुं दे ४

नांदेड, ३०-६-३३

## फटत्कार

जाति–कोकिला

सूं सूं सुटूं दे बाण पारध्या, सूं सूं सुटुं दे बाण
पहा अंतराळांत, मोकळ्या मांडिलेंच उड्डाण !
पारध्या, सूं सूं सुटुं दे बाण !
तापे रवि वर, तेजोदीप्ति—
त्याच आमुच्या नयनीं भिनती,
चढते हृदयीं अथांग भरती
उसळें गीत उधाण ! पारध्या, सूं सूं सुटुं दे बाण !
फडफडाट पंखांचे होती,
अंगिं धुंदिच्या लहरी उठती,
निखाऱ्यांत मम पंख करपती
तरिहि फुलवितों गान ! पारध्या, सूं सूं सुटुं दे बाण

भिऊन तुला नच पंख गाळितों,
तुझ्या बाण संगतींच उडतों,
निर्भय उघडा ऊर धडकतां,
साधी शर-संधान ! पारध्या, सूं सूं सुटुं दे बाण !
ठाण मांडुनी, उभे राहुनी
ओढी दोरी बाण लावुनी
मम हृदयाचें लक्ष्य करोनी,
करकर चढवि कमान ! पारध्या, सूं सूं सुटुं दे बाण !
पत्रनिं येउं दे तत्र शर नाचत
रक्त-पिपासा असो खुवखुवत
मृत्यु मुखावर तळपो हांसत
त्याचें काय गुमान ! पारध्या, सूं सूं सुटुं दे बाण !
घेउनि रूतला बाण स्वांतीं
धुळींत पडतांपडतां अंतीं
एक तान फेंकीन, तुला ती—
खचित करिल बेमान पारध्या, सूं सूं सुटुं दे बाण !

नांदेड, २६-३-३२

# देवि येते घरां !

राग–भैरव

ही प्रकाशे धरा देवि येते घरां
पर्वताली डुले सिंधु आनंदले
हर्षुनी नाचतीं तीं नभोमंडलें
ध्वांत कांपे, पळे तो गिरीकंदरा देवि येते घरां १

लोहशूलध्वजा मस्तकालंकृता
प्राणपुष्पांचिया तोरणीं मंडिता
शोभिता स्वागता राजरथ्या करा देवि येते घरां २

चलतडिद्वाहिनी, खड्गधनुधारिणी
रम्य रातोत्पलें अंगशृंगारिणी
मर्दिनी, नंदिनी, दिव्यरक्तांबरा देवि येते घरां ३

मुक्तकेशा निशा ती सुधावर्षिणी
नरकपाला करीं येतसे घेउनी
दान मागे जिवाचें, पुढें व्हा, सरा देवि येते घरां ४

रक्तधाराभरें पात्र तीचें भरा
त्यागतेजोबळें रंगवा अंबरा
आज स्वातंत्र्यमूर्ति प्रसन्ना करा देवि येते घरां ५

नांदेड, ११-२-३०

# मी आणि कवि

जाति–पुंडरीक

मी :—

तुज गीतीं काय कवे, शांति लाभते
बहर झडुनि तो जाई
तोर हा नवा येई
स्वस्थ संथ अजुनि कसें गान चालतें ? १
तव देवी सुंदरता
जरठ जीर्ण होय अतां
तरुण-अरुण लहरि कशी कवनिं उसळते २
केश तुझे पांढुरले
स्वरतरंगही थिजले
अंगुलि तव वीणेवरि कम्प पावते ३

कवि :—

देवीसौंदर्य ढळें
काळ, विश्व जरि बदलें
गीत-चाहुली त्याच हृदय ऐकितें ४
तुमशीं मज समाधान
मज व्यथाहि त्या प्रमाण
मम आंतर वेदनेंत गीत उमटतें ५
असुं दे मज मदिय व्यथा
एक मधुर तूं कविता
पाहूं नभ अजुनि किती कात बदलितें ! ६

हैद्राबाद, १५-८-३४

# तोडूं कडी चला

गजल

फोडूं खडी चला तोडूं कडी चला या
जुल्मी तुरुंग-भिंती मोडूं पुढें चला या
घालून शृंखलांना या मुक्त होऊं सारे
कैदी बनून अंतीं मानव्य घ्या चला या
तोडूं कडी चला या
ही थांबवाल केव्हां विक्री तनूमनाची
नाहीं गुलाम आम्ही रक्तें लिहूं चला या
तोडूं कडी चला या
कोणी जगीं न राही कल्पांतिचा गुलाम
मत्ता हुकुमशहांना गर्जू वदूं चला या
तोडूं कडी चला या

ही शांति दुर्बलांची शक्ती सहिष्णुतेची
क्रांती उभी करील, होमूं तनू चला या
तोडूं कडी चला या
दग्धास्थिचें बलींच्या रणशिंग गर्जता हे
आव्हान तें श्रवूनी जीवें लढूं चला या
तोडूं कडी चला या
सोलून अंग केला झेंडा स्वतंत्रतेचा
पाडील कोण सत्ता त्यातें बघूं चला या
तोडूं कडी चला या
क्षितिजापलीकडून येती अनंत बाहू
सांभाळण्या ध्वजाला आतां तुम्ही चला या
तोडूं कडी चला या

बुधवेल, २१-११-३८

## मजूर

चाल—लइ बेस झुनका भाकूर

खेळतां नाच मधु-रंग		नभचुंबित रंगमहालीं
कधिं विचार ये कां हाडें		पिचलींत कुणाचीं खालीं !
नेसतां तलम वसनें तीं		कल्पना शिवे कोणाला
किति दुःखदग्ध अंतड्यांचा		तो पडला पीळ सुताला ?
गृहिं सांठवितांना धान्य		धबकलां असें वाटून ?
"कुणिं वाढविलें शेतांत		ते घाम-अश्रु सिंचून !"
हां शेठ, जरासें थांबा		मोजितां, द्रव्य कोषांत,
कितिकांची माती केली		तें सुवर्ण ये हातांत ?
नृपतिनों, पृथ्विमोलाचे		मुकुटांत जवाहिर जडिलें
किति युगानुयुग कोणाचें		नें रक्त गोठुनी बनलें ?
म्हणवितां तुम्ही रणगाजी,		करितसां कुणावर वार ?
या तुमच्या शस्त्रास्त्रांना		लाविली कुणी रे धार ?
हे हेच मजूर पथींचे		वाहती शिळांचे भार
या युगिंचे हे शिबिराज		निज यज्ञ ज्यां कुलाचार !
ते म्हणती, "या श्येनांनों !		या सारे करुनी पाळें
घ्या अपुलें भारंभार		तनु-लचके तोडून सगळे !"

नांदेड, २५-३-३२

# जा पिउनि घोंटभर पाणी

[ सत्तावनच्या स्वातंत्र्यसमरांत किती तरी विहिरी फिरंग्यांनीं स्वातंत्र्य-वीरांच्या प्रेतांनीं भरून टाकल्या होत्या. अशाच एका विहिरीचें हें गाणें आहे. नेहमीं तृषार्त पाण्यासाठीं तळमळतो, परंतु इथें स्वतः पाणीच तृषार्तां-साठीं 'तहानेलेलें' आहे आणि ती व्याकुळ विहीर वाटसरूंना पाणी पिण्यासाठीं हांका मारीत आहे. ]

जाति—उद्धव पादाकुलक मिश्र

या तहानेल्यांनो, कोणी
जा पिउनि घोंटभर पाणी
आसाडित मी आड एकलें
निराश क्षुधितांचे जणुं डोळे
वाटसरूंस्तव मी आसुसलें
या, कुणीतरी या चुकुनी
जा पिउनि घोंटभर पाणी ॥ १
शतकांचें शेवाळें जमलें
आटत तडतडनें जळ सडलें
बुडबुड्यांतुनी विखार उठले
परि अमृत आत अजोनी
जा पिउनि घोंटभर पाणी ॥ २

मिंत न माझी दगडविटांची
तुमच्या पूर्वज-नर-रुंडांची
पहा सारुनी माती वरची–
येईल रक्त घळघळुनी
जा पिउनि घोंटभर पाणी ३

स्वातंत्र्यास्तव जे लढले रणिं
त्यांस रिपूंनीं चरचर चिरुनी
भिंत बांधिली मुंडावळिंनीं
मी होय लाल रुधिरांनीं
जा पिउनि घोंटभर पाणी ४

त्या दिवसापासुनि मग नाचें
ह्या जळिं, पाणी प्रलय-विजांचें
रस मृत्युंजय सुधारसाचे
न्या 'गंगा' न्या ही इथुनी
जा, पिउनि घोंटभर पाणी ५

जयकांक्षा अपुऱ्या तडफडती
बुडबुड्यांत ह्या जाळ भडकती
शेवाळांतून धूर दाटती
व्हा आगच आग पिउनी
जा पिउनि ,घोंटभर पाणी ६

हिमायतसागर, २३-३-४२

## युगचाहुली—

[ 'युगचाहुली' या खंडकाव्याचें प्रस्तावना गीत. ]

जाति—सुष्टिलता

मी ऐकें त्या चाहुली
युगाच्या ऐकें त्या चाहुली
पायरवांनीं ज्या बळिराजा दचके सागरतळीं
मी ऐकें त्या चाहुली

शिरीं धुमारे अपमानाचे
तळीं निखारे पराभवाचे
अमृतघनांचीं स्वप्नें घेउनि मम कविता चालली
मी ऐकें त्या चाहुली १

धरणी कांपे पदशब्दांनीं
कळे न येई कोण कोंठुनी
विजेपरि कडकडुनि खडावा वाजति दिङ्मंडळीं
मी ऐकें त्या चाहुली २

बंदिघराच्या भिंती खचती
बेड्यांतुनि स्फुल्लिंग थडकती
जुलुमाच्या वेशींतिल भेरी आव्हानीं भंगली
मी ऐकें त्या चाहुली ३

वद्धहस्त तळघरांत सडुनि
यौवन मेलें जें तडफडुनी
स्वप्ने त्याचीं दवाग्नपंखा फडफडून पसरलीं
मी ऐकें त्या चाहुलीं ४

शुष्कस्तनिं आईच्या रडुनी
दुधाविण पडें जें शिशु मरुनी
पथरल्या बुबुळांतुनि त्याच्या आग ओकि वाहुलीं
मी ऐकें त्या चाहुलीं ५

अन्नरास नित समोर बघुनी
उपाशींच जे मेले कुढुनी
मुक्या अस्थितिल त्या ज्वालांची वेताळें धावलीं
मी ऐकें त्या चाहुलीं ६

छेदुनि निज शिर झलित नाचत
ऊष्ण उसळतें रक्त प्राशित
खंडित जयकांक्षाचामुंडा छिन्नमुंड प्रगटली !
मी ऐकें त्या चाहुलीं ७

हैद्राबाद, १३-४-४३

# हिमालयास—

[ 'अग्निपथ' या खंडकाव्यांतून— ]

जाति—लीलारति

निज असीम हिममय तपःशांति सोडुनी
हिमनगा, खवळ तूं अग्निगिरी होउनी !
जडभरतापरि तूं स्तब्ध किती बसशिल ?
निर्लज्ज किति युगें उदास तूं बघशिल
कां पांडुर झालें रक्त तुझें गोठुनी ?
हिमनगा, खवळ तूं अग्निगिरी होउनी ! १

हा गंगायमुना अश्रुधार वाहुनी
तव व्यथाभार हलका नच करितिल कुणी
तूं त्रिनेत्र उघडीं, तुहिन-जटा आपटुनि
हिमनगा, खवळ तूं अग्निगिरी होउनी ! २

शशितारामंडित भाळावरि गिरिवरा
आरळला साहाशि किती चंद्रशेखरा
तूं प्रलय-तांडवी वीरभद्र, उठ क्षणीं
हिमनगा, खवळ तूं अग्निगिरी होउनी !

# करूं तिथें आघात

[ 'अग्निपथ' ह्या खंडकाव्यांतील गीत ]

**जाति–अंजनी**

करूं तिथें आघात पहिला करूं तिथें आघात
स्वर्गांतुनि दुबळ्यावर घडतो जेथें वज्राघात !
'शिव' नयनांना बघूं न देती
'सत्य' वाणिला वदूं न देती
प्रगतीला श्रृंखला घालिती
मानवतेस्तव वळिती जेथें फास मानवी हात !
पहिला करूं तिथें आघात !
ज्यांच्या श्रमजळिं नभिं घन भरले
धान्य जयांच्या तपनीं पिकलें
यश ज्यांच्या मरणांत जन्मलें
गुलाम त्यांना करिती जेथें तयांच्याच देशांत !
पहिला करूं तिथें आघात !
राजगृहांसह, धर्ममठांसह
नगरपुरांसह, साम्राज्यांसह,
शत शत राजांसह देवांसह,
ब्रह्मांडाचा भार वाहि त्या शिरीं मारिती लाथ !
पहिला करूं तिथें आघात !
चलारे, करूं तिथें आघात
स्वर्गांतुनि दुबळ्यावर घडतो जेथें वज्राघात !
पहिला करूं तिथें आघात !

# ध्वज आज नवा उभवूं

[ 'अग्निपथ' या खंडकाव्यातील जनतागीत ]

ध्वज आज नवा उभवूं
कपोत वाळे रक्तपिपासू श्येनाशीं लढवूं
ध्वज आज नवा उभवूं !

रम्य भविष्याच्या स्वप्नापरि
केव्हां प्रलय-विजांच्या घडिपरि
ध्वज डोलू द्या, साउलींत त्या नव पाइक जमवूं
ध्वज आज नवा उभवूं !

वसन ध्वजाचें विश्वशांतिचें
रंग पदाहत आकांक्षांचें
असंतोष-ज्वालेपरि फडफड युग-पल्लव उडवूं
ध्वज आज नवा उभवूं !

राजाचें सिंहासन उलथे
धरणि फुटुनि तारांगण कलथें
ढासळलेले बुरुज जगाचे अग्निफुलीं फुलवूं
ध्वज आज नवा उभवूं !

प्रतिकारा तृणपातें उठलें
आसन इंद्राचें हादरलें
वज्रांशीं झुंजण्या बाहुल्या मातीच्या सजवूं !
ध्वज आज नवा उभवूं !

# क्रांतिपुरुष

( ‘ आशिया ’ या खंड काव्यांतील एक स्तबक )

मुक्तछंद

चाळीस कोटी हे भारतीय वीर
निर्भय, कोमल
असिधारेपरी, श्वेतपद्मापरी
यांच्या हृदयांत जान्हवीची धारा झुळझुळ वाहे
अरुणकालीचें उपनिषद्‌गान
संध्या समयीचें मंत्रजागरण
गाईंच्या घंटांची मंजु किणकिण
चांदण्या रात्रीचें प्रेमळ कूजन
ऋषिकन्यकांचें अंचलस्फुरण
अनंतयौवना उर्वशीउरींचें उन्मत्त स्पंदन
यांच्या मनामध्यें अजून जागतें !

कुरुक्षेत्रीचें तें भीषण कंदन
चितांचें ज्वलन
स्त्रियांचें क्रंदन
युधिष्ठिराचे ते निश्वास करुण
शांतीची वेदना
दाटे त्यांच्या मनीं कांठोकांठ !
कालिंदीकांठीचे मंद्र वेणुध्वनि
विणितात स्वप्नें तयांचीं अजून
द्रौपदीच्या मुक्त कृष्ण वेणींतील
अदग्ध फुलांच्या कथा तरळती त्यांच्या नयनांत !
बुद्धाचें निर्वाण
अशोकाचे अश्रु
ताजमहालाचे सुंदर मीनार
आरस्पानी ते—
कुण्या प्रेमीकांचे हिमगौर बाहु
कृष अस्थिशेष
चिर पसरले आलिंगनासाठीं
अनंत नभांत कांपती हालती !
चित्रें हीं अनंत त्यांच्या नयनांत
जागती लोपती.
रत्नांची पेरणी

मोत्यांचीं कणसें
दुधाचे निर्झर
फुलांच्या ओंजळ्या, सोनियाचा धूर
चांदीच्या रात्रींचीं सोन्याचीं तीं स्वप्नें
स्वातंत्र्याच्या उषा
मुक्तीचीं तीं गाणीं
जरीपटक्याची विजेची पताका
आणि त्यांत हाय !—
फितुरी खंजीर मीर जाफराचा
घुसे पाठींतून विषारी दुधारी.
उडे चिळकांडी रक्ताची चौफेर
पायीं खळाळती दास्याचे लंगर
ढांसळले दुर्ग, पेटले बुरूज
चूर्ण सिंहासनें
उध्वस्त महाल
मुकुटांची धूळ
उठे धूर त्यांत दारुगोळ्यांचा तो
हांसत जे गेले फांसावरि वीर
तयांचीं शरीरें वृक्षांस लोंबती
फुलेंच क्रांतीचीं !
स्मरतें हें सारें

सत्तावनीच्या त्या रक्तानीं रंगल्या
रोट्यांचा तो घास
अजून घशांत घोटाळे देशाच्या
जालियनवाला बागेमधील त्या
रक्तचिखलानें
वस्त्रें मळलेलीं साऱ्या भारताचीं
अंदमानांतील
अन् काळ्या पाण्याचे विखार डोळयांत
वादळ मांडिती क्रोधाचें, लज्जेचें——
आणि हुतात्म्यांच्या चितांचे निखारे
खवखवोनिया त्यांत पेटतात !
निःशस्त्रांचा तैसा शांत प्रतिकार
तापलेल्या लाल बंदुकीच्या गोळ्या
विझती स्मितांत एक दयामय !
विफल कटांचा
क्रांतिकारकांच्या विजयघोषांचा नभीं कोलाहल
होई मेघनाद गंभीर भीषण
प्रगटे त्यांतून रुद्ररूपधारी
ऑगस्ट क्रांति ती !
क्रांतिपथें चाले
दिव्य आशियाचा पुराण पुरुष

## रुद्रवीणा

पदोपदीं त्याच्या खचें तारांगण
हादरे ही भूमि
उठे पाउलांच्या धुळीतून धूर !
दिग्गज नाचती त्याच्या पाउलांत
फुत्कारती नाग त्याच्या मानसांत
परशुरामाची परशूची ती धार
त्याच्या नेत्रामधीं तळपे कठोर
होतांच आज्ञा ती रेणुकेचा वध करील तात्काळ !
पुन्हा निज माता जिवंत करून
करील धरणी निःक्षत्रिय सारी एकवीस वेळां.
उन्मत्त अधीर ऐसा रणधीर
आशियाखंडाचा नव्या मानव्याचा
हा क्रांतिपुरुष
अवध्य अनंत !
स्वातंत्र्य तिलक पूर्वेच्या कपाळीं
रेखील उद्यां हा मेळवोनी त्यांत
रक्त अश्रु आग !

औरंगाबाद, २३-३-४७

## वीणावतीस—

बघ दुःखाश्रूंनीं वदन धरेचें भिजलें
नभिं फिरति चित्रघन रंगहि त्यांचे ओले
तूं छेडुनि वीणा मंद्र मधुर झंकारीं,
कर मुक्त गीत या चिरदुःखित हृदयांचें
वाहुनी आण अन् अमृत निज अंतरिचें !

औरंगाबाद, ७-३-४७

## तें तुझेंच गाणें

जाति—अंजनी

तें तुझेंच गाणें ग
युगायुगांतुनि गात चाललों, गातचि जाणें ग
मला तें गातचि जाणें ग
विरह घडो वा मीलन घडुं दे
जन्मोजन्मीं तुटी पडूं दे
अकाल, उन्मद बनुनि वेदना रचितों स्वप्नें ग
तें तुझेंच गाणें ग १

अथांग तव शर्बती लोचनें
क्षितिज हंसे जणुं पिउनि चांदणें
तुझें नयन नित नवे घालिती निळे उखाणे ग
तें तुझेंच गाणें ग २

गांवसिमेवरि तरुछायांतुनि
मूक हालत्या निशातमांतुनि
गूढ एकलेपणिची हुरहुर हृदयिं थरारे ग
तें तुझेंच गाणें ग ३

स्वर्गंगेच्या कमरपट्यांतुनि
नक्षत्रांच्या अस्फुट किरणीं
उरस्पंदनापरि जें कांहीं धडकत येतें ग
तें तुझेंच गाणें ग ४

पडे ना पडे जें धरणीवरि
मुग्ध बिजेच्या चंद्रकलेपरी
हास्यलकेरी बनुनि दिशांतुनि जें खसखसतें ग
तें तुझेंच गाणें ग ५

पाडा आल्या फळांत खुपतें
उमलुं सजल्या कळ्यांत सलतें
रसिकास्तव जें रसगंधापरि पवनिं उसासें ग
तें तुझेंच गाणें ग ६

अग्न न ठावा ज्या हिमकालीं
प्रियालिंगनीं ऊब मिळाली—
भ्रुवावरिल त्या स्पर्शापरि जें हळूंच शिवतें ग
तें तुझेंच गाणें ग ७

औरंगाबाद, ३१-८-४५

# वसंत ये मी—

जाति–प्राणसखी

वसंत ये मी, नवे अर्थ अन् नवे शब्द घेऊन
नवारुण मत्त पालवींतून
ह्या शब्दार्थां, उधळ कोकिळे, नादब्रह्म करून
साजणी, मधुरमदिर गाऊन १

आषाढाच्या सांद्र घनाचें विद्युत्स्वप्न सजून
उठें मी काळया रात्रिमधून
पुनर्वसूच्या त्या स्वप्नांचें पावसगान म्हणून
नाच तूं घनवर्षा होऊन
साजणी, मधुरमदिर गाऊन २

मी खळखळता तुफान फेनिल दर्यावर ये पूर
मृद्गंध धुंदिमधि चूर
तूं जलवन्ती, नाच चाळ त्या फेनाचे लेवून
पुराचें तरुण गान घुमवून
साजणी, मधुरमदिर गाऊन ३

स्वातंत्र्याच्या यज्ञीं कोणी तनु देई होमून
रुधिर मी बळिचें ये उसळून
त्या रक्ताची उषा जागवी उषःसूक्त गर्जून
ठिणग्यांचे चरण रचून !
साजणी मधुरमदिर गाऊन ४

हैदराबाद, एप्रील ४३

## मधुराणी

जाति–भूपति

सांडु दे फेंस ! घे भरी भराभर चाले,
बस ठेवुं नको तूं आज रिकामे प्याले !

फसफसुनी खदखद हसुं दे मधु पात्रांत,
खिदळुं दे तेंच तूफान तुझ्या नयनांत !

मम जीवन–तळ मज दिसला तव चषकांत
लागला हृदयिंचा थांग तुझ्या डोळ्यांत

कां संकोचुनि तूं बघशि आंखल्या नयनीं ?
नारिंग उडवुं मधुलहरींवरती धरणी !

मधुराणी, कर पाजुनी जिवाला धुंद
बुडविले इष्क–प्याल्यांत लौकिकी छंद

भर प्रेमा,–भरिशीं–भरूं दे चषक विषानें
टाकितों पिउन, हांसून, आण, तृप्तीनें !

परि नको निराशा प्रीतीची मज दावूं
प्रिय हास्या, हृदयीं सुरी नको रे होऊं !

नांदेड, २०-३-३२

# प्रीतीचं मोल

जाति–मिश्र अंजनी

साजणी, बोल, प्रीतिचं काय या मोल ?
जीवन अपुलें हें दोघांचें
श्वास वेणुंतिल दो अधरांचे
नीरव असल्या धुंद सुरांची काय माधुरी बोल ?
प्रीतिचं काय या मोल ? १

दोघे जुळलों वादळपूरें
एक नदीचीं दोन्हीं तीरें
यौवनांतलें तुफान अंधळें चल अनुभवुं घनघोर
प्रीतिचं काय या मोल ? २

स्वप्न सहस्रें जिथें उमललीं
क्षितिजसहस्रें जिथें निमालीं
त्या डोळ्यांचं सांग, साजणी, पाणी किति ग खोल
प्रीतिचं काय या मोल ? ३

आलिंगन हें एकचि बंधन
श्रेय जीवनीं सायंमीलन
युगें देउनी क्षण ये घेऊं, बुडतां हा भूगोल
प्रीतिचं काय या मोल ? ४

बुधवेल, २७-१०-३९

## त्या तरुतळीं विसरलें गीत

त्या तरुतळीं विसरलें गीत
हृदय रिकामें घेऊनि फिरतों इथें तिथें टेकीत
मुक्या मना मग भार भावना
स्वरांतुनी चमकते वेदना
तप्त रणें तुडवीत हिंडतों ती छाया अठवीत
तरुतळीं विसरलें गीत १

विशाल तरु तरी फांदी लवली
थंडगार घनगर्द साउली
मनिंचीं अस्फुट स्मितें झळकतीं तसें कवडसें तींत
त्या तरुतळीं विसरलें गीत २

हिरवळ–तृप्तिच जशी पसरली
फुलें अनामिक त्यांत विकसलीं

निळेंभोर अव्याज गगन वर हंसतें ढग पिंजीत
त्या तरुतळीं विसरलें गीत ३

जवळ टेकडिंत झरा झांकला
कसातरी वाहतो खळखळा
निकट जिवाची पुरति न कळली जशी संभ्रमित प्रीत
त्या तरुतळीं विसरलें गीत ४

मदालसा तरुवरी रेलुनी
वाट बघ सखि अधिर लोचनीं
पानजाळि सळसळे, वळे ती मथित हृदय कवळीत
त्या तरुतळीं विसरलें गीत ५

पदर ढळे कचपाश भुरभुरे
नव्या उभारिंत ऊर थरथरे
अधरीं अमृत उतूं जाय परि पदरीं हृदय व्यथीत
त्या तरुतळीं विसरलें गीत ६

उभी उभी ती तरुतळिं शिणली
भ्रमणीं मम तनु थकली गळली
एक गीत—परि चरण विखुरलें द्विधा हृदय—संगीत !
त्या तरुतळीं विसरलें गीत ७

बुधवेल, सप्टेंबर ३७

# ये पूर्ण कराया चित्र गडे !

जाति—प्रणयप्रभा

ये पूर्ण कराया चित्र गडे, मम हृदय—चित्र अपुरेंच पडें !

स्तब्ध करी निस्तब्ध कुंचला
रंग रंगदाणींत संचला
चित्रकल्पना चित्त—चंचला
जड रंगांना या नच अंतुडे ! ये पूर्ण कराया चित्र गडे

ओढ्यामधुनी कळशी भरुनी—
घेतांना शिरिं, अंग तोलुनी
मीनाक्षी, जळिं टकमक नयनीं—
ते मीन पाहती तुझ्याकडे ! ये पूर्ण कराया चित्र गडे

सांजरंगिं जळ निळें तळपतें
रूप तुझें त्यामधें झळकतें

लाट निजसुरी मृदु पुटपुटते
जणुं ओढ्याला तव स्वप्न पडे ! ये पूर्ण कराया चित्र गडे

कलावंत तो, चित्रकार तो
झरा जळीं तव चित्र काढितो
चित्रकार अम्हि वृथा म्हणवितो
नवरंग खुले, परि भाव दडे ! ये पूर्ण कराया चित्र गडे

भाव लोचनीं भिरभिरणारे
हृदयीं पदरीं फडफडणारे
श्वासांमधुनी थरथरणारे
सुमरंगि गंधसम करिं उघडे ! ये पूर्ण कराया चित्र गडे

शिंगणापूर, १६-७-३१

# तूं ओ दिली कुणा !

जाति–प्रणयप्रभा

तुज काय होतसें क्षणा क्षणा मम हृदया, तूं ओ दिली कुणा ?
कुणा पाहिलें ? कुणीं बाहिलें ?
कुठें कुठें तव नेत्र लागले ?
भाव मुखींचे किती उहुळले ?
कां नेत्रीं हा बावरेपणा ? मम हृदया, तूं ओ दिली कुणा ?
घडिघडि चाहुल कसली घेशीं ?
भिरी भिरी भोंताली बघशीं,
आपुल्याच दृष्टीला भीशीं,
निज नजर-जालिं गुंतशीं पुन्हां ! मम हृदया, तूं ओ दिली कुणा ?
कुठें सारखें कोण पालवी ?
ओढुनि पुढती कोण चालवी,
डुलवी, फुलवी, हंसवी, रडवी ?
हें काय झळंबें तुज सजणा ? मम हृदया, तूं ओ दिली कुणा ?
उभा पाहशीं आतुर नयनीं
किती बोलशीं खोल रवांनीं !
तव हृदयाच्या धडकी मधुनी
तें ऐकूं येईल काय कुणा ? मम हृदया, तूं ओ दिली कुणा ?
विश्वासामधिं कां तळमळशीं ?
आशेनेंची जाळ लाविशीं,
अंतरंगिंचा होम मांडिशीं,
कां पसायदानाविणें मना ? मम हृदया, तूं ओ दिली कुणा ?

## जलतरंग

अभंग

रोजच्याच साऱ्या क्रूर आघातांनीं
झालें पाणी पाणी हृदयाचें
तयांनीं भरून आयुष्याचे प्याले
मांडून ठेविलें तुजपुढें
करून त्यावरी कोमल आघात
स्वर लावी सात वादका रे !
होऊं दे कशीही जीवनाची गत
आपुलीच 'गत' वाजवी तूं !
आघातें प्याल्यांत स्तब्ध जलावरी
उठवी लहरी मंद मंद
जीवन—भंगांत आणि भरपूर
काढी गोड सूर वाटती ते
माझ्या हृदयींच्या आघातें निर्मित
असें हें संगीत आलापी तूं !
पर्वा न घावांची, मृण्मय प्याल्यांची
माझ्या हृदयाची, गीतांसाठीं !

नाशिक, १८-३-४२

# आली मधुरजनि

[ ‘ भग्नमंच ’ या नाट्य प्रवेशांतील एक गीत. अहीची पत्नि चंद्रसेना श्रीरामचंद्राची वाट पहात शय्यागारांत उभी असून, प्रतीक्षेत खालील गीत म्हणत आहे :-- ]

जाति—शुभवक्त्रा

आली मधुरजनि

हांस सखे, आली मधुरजनि

छायांचे चाळ घोळ अन् तारांचे झळाळ

दावित लपवीत हंसुनि नवजलदांवरुनी

आली मधुरजनि १

निद्रेची ऊब पदरीं स्वप्नांचें स्मित अधरीं

यौवन निश्वासिं भरित अवकाशांमधुनी

आली मधुरजनि २

विकसन मम हृदयाचें पुलकन अंगांगांचें

लवकंपन लज्जेचें फुलवित स्पर्शांनीं

आली मधुरजनि ३

मावळता सांध्यरंग अतृप्तीचा तरंग

कीं अपुरा अंगसंग सलुनि जाय नयनीं

आली मधुरजनि ४

रात्रीची ही किरकिर मज संकेताचे स्वर

यौवन-मधुमास मला हांक देइ फिरुनी

आली मधुरजनि ५

## भर, सखये, भर पुरती ओंजळ

जाति–नववधु

भर सखये, भर पुरती ओंजळ मुसाफीर मी तृषित व्याकुळ
वाळवंट नी पठार तुडवुन
पाणोठ्यावर आलों लाम्बुन
ऊन्ह शिरावर करतें रणरण
दावि न नयनीं तूंही मृगजळ भर सखये, भर पुरती ओंजळ १
श्रमलिस जरि तूं ओढुनि पाणी
परतायाची घाई सदनीं
हंसतिल–भींती–तुला मैत्रिणी
'जळास कळुं दे मासोळीची कळ' भर सखये, भर पुरती ओंजळ २
पिऊं दे जळ मज अतां पोटभर
कळे न केव्हां मिळेल नंतर
पंथ पुढें वैराण भयंकर
स्नेहल स्मृति तव त्यास पालविल भर सखये, भर पुरती ओंजळ ३
सजल आड, वटछाया शीतल
तव उर कंपित, खळखळतें जळ
भिजट स्मित मुखिं श्रमजलिं चंचल
चित्र कल्पवर या मनिं राहिल भर सखये, भर पुरती ओंजळ ४
भाग्यवान हा कलश साजणी,
नाचे तव कटिखांद्यावरुनि
नित्य हृदयिंची मूक कहाणी
तोच तुला सखि, कधितरि सांगिल भर सखये, भर पुरती ओंजळ ५

# खंजिरी

ही देगांवची दंतकथा आहे. तिथला पाटील मोटा शिकारी होता. एके दिवशीं त्यानें एका हरणाची शिकार करून त्याच्या कातड्याची खंजिरी बनविली आणि त्या नव्या खंजिरीच्या साथींत आपल्या गढीवर नाचरंग मांडला. नाचण नाचूं लागली. नव्या कडक खंजिरीचे बोल घुमूं लागले. घुंगराच्या झंकारांत मैफिल बेभान डोलूं लागली. परंतु इकडे गढीखालीं, त्या खंजिरीचा आवाज ऐकून आणि आपल्या प्रियकर काळविटाच्या कातडीचा नाद ओळखून हरिणी रडूं लागली. गढीच्या पहारेकऱ्यानें तिला विचारलें :—

जाति—केशवकरणी

पहारेकरी :—

देशमुखांच्या गढिवर वाजे खंजिरी झंकारुनी
पाहशी कां हरिणी दचकुनी ?
ये चांदरात हळुं धुंद स्वप्नापरी
—कष्टांतुनि, दिनिंच्या स्फुरे गीत-माधुरी !—
वाऱ्यांत थरारे एक मधुर शिरशिरी
नवथर उरिंच्या मृदुल उबेस्तव जीव उठे फडकुनी
पांघरुण अपुरें वाटें मनीं ! १

मृगबाले, उडतें धडधड उर तव किती
अश्रूंत नयन तर तव विर्घळुं पाहती
छे! नसे रक्तपी शिकारिची हांक ती
दशमुखांची मैफिल रंगे, भरास ये लावणी
पाहशी कां हरिणी दचकुनी? २
नागीण नाचते धुंदफुंद हांसुनी
ते तुझे शिकारी लोळति पदिं झिंगुनी
त्यां गमे नाचते उरींच जणुं कंचनी!
'तोडा' संपे, थाप समेची बसे खंजिरीवरी
परी तूं कां हरिणी घाबरी? ३

हरिणी:— "ती थाप समेची जीव हेलकावते
सोडवून चारापाणी मज ओढिते
नाचांत न तुमची ती खंजिरि वाजते
मेलें तरि तें मम हरिणाचें हृदय रडें फुंदूनी!
धावलें व्याकुळ मी होउनी ४
मम हरिण सखा ह्या देशमुखें मारुनी
खंजिरी बनविली प्रीति-हृदय सोलुनी
तव गीत स्फुरतें अमुच्या आक्रंदनीं!
थापे सरसीं, खंजिरींत मज हरिण वाहि विव्हळुनी
रंगते परि तुमची लावणी!" ५

धुधसेल, १६-१०-३७

# सांपळा

सुनीत

रंगाच्या लहरी नव्याच भरती वायूसवें चंचल
रम्याशेपरि हा गुलाब फुलला, शाखेवरी मंगल
लज्जा या सुमनांतुनी मधुरता घेवोनिया जन्मली
मोहाया, रमणींस गालिं अधरीं यानेंच लाली दिली
झाला पूर्ण विकास हा, प्रतिदिनीं उन्माद त्याचा भरे
अन् ती मादकताच एक गहिरी खालींवरी संचरे
गंधाचीं मधुवर्तुलें गरगरा वाऱ्यांतुनी भोंवतीं
त्या गंधोन्मदमंदसांध्यपवनें हृद्वृत्ति उन्मादती
पुष्पा त्या बघतांच बोल उठती 'सौंदर्य हें वांछित'
मेलेले मधुभोगभाव हृदयीं होती पुन्हा जागृत
पीडा दे अभिलाष, खोल हृदयीं अतृप्तिची वेदना
गेलों पुष्प खुडूं, निवेल म्हणुनी वांछा-व्यथा तापना
  झाला स्पर्श न तोंच, हाय ! गळल्या संफुल्ल त्या पाकळ्या
  हातीं देंठ उरे, कुण्या रमणिचा कीं अस्थिचा सांपळा !

नांदेड, १९-३-३२

## दीपाचें मनोगत

छंद–देवीवर

जळतों मी नंदादीप देवि, तुझ्या मंदिरांत
तुझ्यासाठीं स्नेह प्रभा धग माझ्या अंतरांत

मला माहित ना कांहीं विराजशी सिंहासनीं–
गेलीस वा कोठें दूर माझें राऊळ सोडोनी।

तुला बघायास डोळे दिले माझ्या न ज्योतीला।
जळणारें तुझ्यासाठीं एक हृदय तें तिला

वाट-पाहत्या डोळ्यांचें अनंताचें जागरण
वाट पाहावें, जळावें, दग्ध प्रीतीचें जीवन

परी अज्ञात देवते, खूणगांठ बांधीं मनीं
तुज करीन साकार अंतीं माझिया ज्वलनीं

२४ आगस्ट ४५

## शेजारिणि, तूं हंसत रहा !

आति–नववधु

साखि शेजारिणि, तूं हंसत रहा
हास्यांत पळें गुंफीत रहा
दीर्घ बदामी श्यामल डोळे
एक सांद्रघनस्वप्न पसरलें
' धूपछांव ' मधिं यौवन खेळें
तूं जीवनस्वप्नें रचित रहा
साखि शेजारिणि, तूं हंसत रहा १

सहज मधुर तूं हसतां वळुनी
स्मित-किरणीं धरिं क्षितिज तोलुनी
विषाद मनिंचा जाय उजळुनी
तूं वीज खिन्न घनिं लवत रहा
साखि शेजारिणि, तूं हंसत रहा २

मूक जिथें स्वरगीत होतसें
हास्य मधुर तव तिथें स्फुरतसें
जीवन नाचत गात येतसें
स्मित-चाळ त्यास बांधून पहा
साखि शेजारिणि, तूं हंसत रहा ३

हिमायतसागर, ११-११-४४

# आलीस उशीरा—

जाति—[illegible]

आलीस कशाला जीवनांत मोहिनी
विसरल्या युगींच्या गीत लकेरीपरी
जाशील एक दिनिं अशीच निघुनी दुरी
ढळतसें चांदणें जसें गवाक्षांतुनी १

अस्पष्ट बोलतां श्वासें उर दाटुनी
गुंजले फुलांवर भ्रमर कुठें कातर
पाहिलें श्यामले, आणि वळुनि जेधवां
दंहिवरले डोळे, गंहिवरलें अंतर २

तपकिरी डोळे किंचित् गहिरे तुझे
उठविती भोंवतीं मदिरेचें वादळ
बेहोष न पुरतें मधुराणी मज करी
पाउलां जाणवें अजुनी जीवन-तळ ३

पसरुनी बाहु कां जीवनसरिते, अशी
येतेस शराबी भावलहरि फेंकित
तव तरंग एकहि धरुनि ठेउं ना शके
निस्तब्ध भंगला माझा जीवन-तट ! ४

आलीस उशीरां जीवनांत, साजणी
वरदान त्यामुळें शाप तुझें जाहलें
संपल्या रात्रि तूं उजळलीस चंद्रिके,
ज्वालेंत दिनाच्या तझें चांदणें जळें ! ! ५

# रमणी; उदविशिं निज कचभार

जाति—अंजनी

रमणी, उदविशिं निज कचभार
मृदुल रेशमी कुरळ मोकळ्या कृष्णसघन विस्तार
जाळिदार नाजूक टोपलें
शिर टेकुनि तूं त्यावर अपुलें
मदालसे, पहुडशी धरुनि कर उरीं स्वस्तिकाकार
रमणी, उदविशिं निज कचभार १

न्हाले ओले केश मोकळे
खांद्यावरुनी स्वैर पसरले
मोत्यांवाणी मधुनि चमकती, टिपुनिहि सलिल तुषार
रमणी, उदविशिं निज कचभार २

धूर सुगंधी धूपदाणींतुनि
हळूंच मिसळे कचपाशांतुनि
अभिलाषा जणुं तरुण जिवांच्या भ्रमति मंडलाकार
रमणी, उदविशिं निज कचभार ३

सळसळतीं नागीणपिलें हीं
नयननीलिमा प्यालीं कांहीं
धूर पाजुनी कशास करिशीं अधिकचि धुंद विखार !
रमणी, उदविशिं निज कचभार ४

हिमायतसागर, १०-२-४३

## अजिंठ्याच्या दाराशीं

[ पारिजाताच्या फुलांमुळें अजिंठ्याच्या चित्रकलेचें व तिच्या रंगकलेचें संरक्षण झालें असें एक शास्त्रज्ञ म्हणतात. मग या फुलांतून अमर मानवी रसिकता तर कलेच्या रक्षणासाठीं संचार करीत नसेल ?—आणि त्या संरक्षक देवतेच्या मनांतलें गाणें असेंच कांहींतरी असेल, नाहीं कां ? ]

जाति—मिश्र सूर्यकांत

त्रिकाळांतली तृषित रसिकता वणवण मी हिंडलें
त्रिखंडीं, वणवण मी हिंडलें
या घाटावरि येतां मजवरि अमृतघट वर्षले १

मुकलित फुलवित पारिजात मग बसलें या डोंगरीं
समाधित, बसलें या डोंगरीं
एक तृप्तिच्या क्षणिं त्या सरलीं शतकें अन् कितितरी २

मधु मंथर भावांचें पहिलें सुमन इथें रंगलें
प्रीतिचें, सुमन इथें रंगलें
गंध ते नि निश्वास जिवाचे एक इथें जाहलें ३

यौवनांगविक्षेपाणीं उन्मद अनंग साकारला
शिलांतुनि, अनंग साकारला
जीवननर्तनीं हृदय-धडकिचा ताल मधुर लागला ४

हास्यअश्रूंना, आशा स्मृतिंना, रूप अरूपा दिलें
कलाकरिं, रूप अरूपा दिलें
ज्वलन तेज दीपाचें स्मीं कुणि फुंकुनि उजळिलें ५

मृदुल वक्र रेषांत असीमा सीमित केलें इथें
अनंता, सीमित केलें इथें
चलत् क्षणा वरदान लाभलें चिरंतनाचें इथें ६

स्वप्न साधितां कलोपासका, श्रमबिंदू सांडले
तुझे जे, श्रमबिंदू सांडले
कालप्रवहीं चिरंतनाचे ते बुद्‌बुद जाहले ७

पारिजातदाळिं हिम नि आंसवें एक होतिं ज्यापरी
सकाळीं, एक होतिं ज्यापरी
स्वप्न नि जीवन युगायुगांचें एक अजिंठ्यावरी ८

सुकवित फुलवित पारिजात मी बसतें या डोंगरीं
म्हणोनी, बसतें या डोंगरीं
एक तृप्तिच्या क्षणिं ह्या विरतिल शतकें अन् किति तरी ! ९

शुभवेळ, २०-१-४१

# दोघे

चालः---बालम, आवो बसो

साजणि, गाया ये मजसंगें   जीवनलहरी झळके भंगे
सूवर्ण गोरजपटीं झांकुनी
सांध्यदीप ये घेऊनि रजनि
जीवनिं तूं तशि येगे   साजणि, गाया ये मजसंगें   १

सघन घनावलि गगनीं दाटत
मधुर भावना हृदयीं थाटत
मोडि न त्या भ्रूभंगें   साजणि, गाया ये मजसंगें   २

शुक्रतेज हळुंहळुं मावळे
त्यांत चंद्रिका कवळी मिसळे
यौवन शैशवसंगें   साजणि, गाया ये मजसंगें   ३

ताल धूसरित उभे नदिवरी
मनिंच्या शंका दूर ज्यापरी
उन्मद हृदय तरंगें   साजणि, गाया ये मजसंगें   ४

नाचुनि नाचुनि रजनी थकली
चाळ वघळले, नभिं तारावलि
नाचूं तुं-मी अंगें   साजणि, गाया ये मजसंगें   ५

हिमायतसागर, २-३-३६

## पदरंजन

जाति—प्रणयप्रभा

रंगवूं नको निज पद रमणी    रंगते धरा ही तव चरणीं !
आरक्तच तव गुलाब-तळवे
रंग तयांना कशास व्हावें ?
रंग उषेमधिं काय भरावें
ये सुवर्ण उधळित जी गगनीं ! रंगवूं नको निज पद रमणी
सहज मृदुल तव पाउल पडतें
तरुण हृदय त्या तिथें चिरडतें
रक्त तेंच तव पदीं लागतें !
ही कशास मेंदी मग वरुनी ?    रंगवूं नको निज पद रमणी।
मदभारें पद टाकित जाशीं
पदरागानें मनें जाळिशीं
संध्योषा परि कधीं खुलविशीं
तूं प्रवेशुनी वल्लभ-सदनीं ?    रंगवूं नको निज पद रमणी !

नांदेड, १६-१०-३२

# गानतृषा

जाति—भूपती

कां वाऱ्यावर टांगिलें उगी मत्प्राण ?
गा, पुन्हा गडे, तें तुझें एकदां गान
डोळ्यांत गूढ नीलिमा, गळ्यामधिं गोडी
ये स्वरें सोडवी शद्वां अवघड कोडीं
गा कलावन्तिणी, मंजुळ मंजुळ गाणीं
त्या नादलहरि सळसळुं दे रक्तांमधुनी
तव सुरांमधें थरकतो नवा आनंद
त्या अनुभूतीस्तव हा होतों बेबंद
चल, तोडुं तटातट हे शद्वांचे बंध
त्या असीम अर्था कशास हा निर्बंध !

× × × ×

जें हृदया दिसलें, कळलें, पटलें, स्फुरलें
शद्बीं न उमटलें शद्बांसच अडखळलें
म्हणूनीच, गायिके, शद्बाशद्बांमधुनी
हृद्भावांचें हें अंतर पडलें तुटुनी
शद्बांतुनि पडतें जें अंतर भावांचें
ते भरुनि काढिती सूर तुझ्या गाण्याचे
शद्बांचें अंतर भरित छेड तूं सूर
बुडवीत तटां जणुं तरंगिणी भरपूर

× × × ×

घे झुळझुळती मधु तान ओठ वळवून
पथचुकल्या तारा भ्रमती नेत्रांतुन

हैदराबाद, एप्रील ३२

# रागोद्धार

[ नांदेड जवळच्या शंखतीर्थ या गांवाची गोष्ट–फार पूर्वीं तेथें एक गायक राहत असे. प्रसिद्ध कलावंत; पण त्याचें गाणें त्याच्या पत्नीला आजन्म ऐकायला मिळालें नव्हतें. तिनें पुष्कळदां विनविलें. परंतु त्यानें मनावर घेतलें नाहीं. नंतर एकाएकीं ती निवर्तली. मग गायकानें मरणा-नंतर तिची इच्छा पूर्ण केली. तिच्या पेटत्या सरणासमोर बसून गायकानें तिला गाणें ऐकविलें. ]

जाति–मनमोहन

"हे जळत्या जीवा, गान ऐक तूं कान जीवाचा करूनी"
आप्त रडती भोंवताली
पुढति हांसे ज्वालमाली
तो कलावंत निज मंजुळ वीणा बोले तव चढवोनी १
"वाटली जी तुज दुराशा
जीवनाची एक आशा
तव थिजल्या नयनीं पुन्हा स्फुरो दे या गायन लहरींनीं २
'ऐकवा' तूं 'गीत' म्हटलें,
मी कधीं त्यातें न गणिलें
ते गान ऐकुनी अतां घुमव तूं जीवन्मरणामधुनी ३
गायनाच्या मोहिनीनें
मोहिली मी रानहरिणें
परि आज मनोमृग विद्ध जाहला त्याच सुरांच्या बाणीं ४

वल्लरी त्या वाळलेल्या
त्या प्रभातीं फुल्ल झाल्या।
त्या स्वरेंच आतां चिता भडकते दग्ध हृदय हें करूनी ५

दीप पूर्वी आळवितां
भूस आली गगनसमता
हा ! दोनच नेत्रीं अतां तेवती दीप प्रीतिच्या किरणीं ६

'मेघ' गातां मेघ वळले
अमृताचे पावसाळे
नयनींच घनें जमलींत वर्षती अश्रु आज खळखळुनी ७

तुजमुळें जें गान झालें
तुजविणें तें आज नुरलें
परि कलादेवते, तुझीच इच्छा गाते माझ्यामधुनी ८

वल्लभ, तो मृत्युराया
मजशीं येतां बोलवाया
त्यासवें तूंहि ये प्रिये, गात हें गान तया शिकवोनी" ९

× × ×

रात्र घोरांदार दाटे
नीर वाहे खळखळाटें
धडधडुनि पेटते चिता, वाइतो वात नभीं फडफडुनी १०

नांदेड, २०-११-३०

# मी नाचत नाचत आलें

( 'आम्रपाली' या खंडकाव्यातील एक गीत. आपल्या सौंदर्यानें व नृत्यानें सैनिकांत प्रतिकाराचें तेज निर्माण करण्याच्या ईर्षेनें नर्तिका आम्रपाली वैशाली नगरीच्या राजपथावर नाचत नाचत प्रवेश करते. नाचताना ती हें गीत म्हणते. )

मी नाचत नाचत आलें
युगायुगाचें असफल यौवन मुरडित अंग निघालें
सौंदर्यकामना हंसरी
मी अभिलाषची लहरी
क्षितिजीं मादक अरुणराग मज चुंबाया तान्हेले
मी नाचत नाचत आलें १

कंकणें करीं किणकिणती
कटिं मेखलाहि रुमझुमती
छुमछुमनी पदिं पैंजण विणिती स्वरनादांचें जाळें
मी नाचत नाचत आलें २

मम नृत्यीं करसंकेतें
लाटांचें तांडव उठतें
भ्रूभंगावरि बघ तारांसह नीलांबर आंदोले
मी नाचत नाचत आलें ३

मी तरुणांच्या हृद्कमलीं
नाचणी नार अलबेली
गिर्कींतुनि मम जरीकिनारीं स्वर्गंगा तेजाळे
मी नाचत नाचत आलें ४

जैं शिवपार्वति नाचती
फणिनूपुर झंकारती
विखार नी झंकार तयांचे, रूपीं मम अवतरलें
मी नाचत नाचत आलें ५

अभिनव हा नाच पहाया
मजसंगें या नाचाया
जड दिक्कालां नाचवावया चाळ आज मी ल्यालें
मी नाचत नाचत आलें ६

औरंगाबाद, जानेवारी ४६

## मोगरा फुले तों थांब

जिवलगा, थांब मोगरा फुलेतों थांब

उद्यां पाकळ्या साऱ्या फुलतिल
साद जिवाला सुगंध घालिल
डोळे उघडुनि आंगण पाहिल

मधुमास हंसेतों थांब मोगरा फुलेतो थांब १

पानांआडुनि गाइ कोकिळा
तप्त नभाचा उर गहिवरला
माझ्याहि उरिं कांटा फुलला

कोकिळा गाइतों थांब मोगरा फुलेतों थांब २

मध्य रात्रिचें मदिर चांदणें
स्पर्शुनि करितें जादू टोणे
जीव घाबरे हा स्वप्नानें

चंद्रमा बुडेतों थांब मोगरा फुलेतों थांब ३

बघ, अवकाळीं घन गडगडती
गंध मातिचे वादळ उठविति
विजा चांदण्यामधिं चमचमती

सर पडुनि जाइतों थांब मोगरा फुलेतों थांब ४

प्रवास अवघड, पंथ दूरचा
अरुण उद्यांचा लोळ अग्निचा
क्षण कुसुमित कर विश्रांतीचा

ये, घाम पुसेतों थांब मोगरा फुलेतों थांब जिवलगा थांब ५

## साखरझोंप

जाति—नववधु

झांकती नयन तव नीजभरें   जरि मंदिरिं कवळें उन्ह शिरें
शेजेवर कर एक रोवुनी
बसशीं स्कंधीं मान टाकुनी
गळतिं फुलें कचपाश सैलुनी
उघडति न मदालस नेत्र पुरे   झांकती नयन तव नीजभरें   १

पलकयुगुल भारावुनि लवलें
प्रतीक्षेंत कां डोळे शिणले
मदिर अरुण रेखा मधिं उसळे
जणुं हृदय जाळुनी जाळ उरे !   झांकती नयन तव नीज भरें   २

स्वप्नें सुंदर निर्दय कुठलीं
तव अपुऱ्या निद्रेंत उतरलीं
नेत्रदळें पदिं रगडुनि गेलीं
ही लाली त्याची कां पसरे !   झांकती नयन तव नीजभरें   ३

विस्मृत जगसम अंचळ पडला
धडके उर निज रसेंच भरला
जणुं कुणि तेथें स्पर्शुनि गेला
मधु उत्कंठा डुकलींत भरे   झांकती नयन तव नीजभरें   ४

हैदराबाद, २५-८-३४

# न पाठविलेलें प्रेमपत्र

जाति–पुंडरीकामिश्र

पत्र लिहियलें सखे, पत्र लिहियलें
पोचलें न तुजजवळीं
राहिलें न मजजवळीं
पाठविलें मीं न कधीं, तूं न वाचिलें   असें पत्र लिहियलें   १
मथित हृदय तळमळलें
शब्द जळत मनिं घुमले
उमटलें न बाहिर जें हृदयिं नादलें   मुके अधर हालले   २
जड शब्दां अडखळलें
चंचल रंगां बुजले
भाव असे कंपाकुल मनिंच राहिले   नयन सजल वांकले   ३
तूं माझी दीपकळी
केंवि कथूं तुजजवळीं
मेंदीचे अरुण रंग पर्णीं झोंपले   कधीं सुमिं न उसळले !   ४
भाव मुके, हृदय मुकें
नयनीचें नीर सुकें
भ्रमत नजर, तनु पोळे, भान सांडलें   किती दिवस लोटले   ५
वाचिलें न मी पुरतें
दाविलें न कोणा तें
लपवुनी उशास लेख अंग टेकिलें   मृदुल अंक भासले !   ६

आकांक्षांसह पवनीं
लेख जाय तो उडुनी
बाभळिच्या कांट्यावर हृदय टांगलें तुवां कधिं न पाहिलें ७

जलधारांनीं भिजलें
उन्हवादळीं विटलें
अभिलाषांसह धुळींत पत्र मिसळलें हंसें गवत वाळलें ८

त्या बाभुळ-तरुजवळुन
फिरतों मी रोज अजुन
मधुर भाव उरींत न हृदयीं न मावले नर्में हंसुनि पुशियलें ९

नित उदास संकोचुन
रोमांचित तनु वठवुन
बाभळिपरि मी विषण्ण हांसतों बळें जरी अंतरीं सलें १०

तव लज्जेपरि पुलकित
अस्पर्शित अनाघ्रात
चिरतरुणा मधुसंध्या पैल नभिं फुले जिला कुणि न चुंबिलें ११

उघडलें न हृदय अधर
कळलें नच मज अंतर
सांध्य-हास्य तव न विटो कधिंहि मजमुळें गळो हृदय वाहिलें १२

बघुं नकोस कधिं वळुनी
मुरडत चल [illegible] मणि
तुज कळो न भामिनि, कुणिं पत्र लिहियलें तुवां कधिं न वाचिलें
सखे, पत्र लिहियलें १३

# तूं दार उघडशिल सांग कसें ?

जाति—नवबधू

तूं दार उघडशिल सांग कसें ? निज मदिर गूढ नयनासरिसें
वर्षुनिया रसहीन घनापरि
शिणुनी येतां मी तव दारीं
मोहिनि, चुंबुनि मज संध्येपरि
भरशिल कां अंतर सांध्यरसें ? तूं दार उघडशिल सांग कसें ! १
मृदुल धवल शशिकिरण येउनि
उघडिति कुमुदां हंसुनि मूकपणिं
येशिल कां गे, तूंहि सजणी
स्वप्नें मधु पेरित निज हास्यें ? तूं दार उघडशिल सांग कसें ! २
हंसत हंसत वा दीपशिखेपरि
उजळित सखये, तम माझ्या घरिं
उभी राहशील उंबरठ्यावरि
जाळीत स्नेह हृदयाश्रु तसे तूं दार उघडशिल सांग कसें ? ३
यज्ञज्वालेपरी वेदिं तु न
करशिल मज वा तूं आवाहन—
बलिदाना, देशांत चहूंकुन
यज्ञकुंड जंव धडकतसें ! तूं दार उघडशिल सांग कसें ? ४

हैदराबाद, १९-११-३९

# जागविलें

जाति—स्मर

साजणि, जागविलें
जलसिंचनिं तूं मज जागविलें
विरळ निळीचा शेला ओढुनि
कुशिंत उषेच्या अन् मुरमुसुनी
निजली धरणी, तिज चाहुलिंनीं सळसळ वसनीं चाळविलें
साजणि, जागविलें १

कातळांतुनी झरणि खळखळे
जागृतींच निद्रेंतुनि खिदळे
कलश भरे तव, मम हृदयीं परि, पाणी त्यांतिल कां उसळें ?
साजणि, जागविलें २

गात परतालिस कलश भरोनी
ताल धरी जळ घटीं हिसळुनी
येतां दारीं हळुं तूं मजवरि जलकण हंसुनी शिंपियले
साजणि, जागविलें ३

**रुद्रवीणा**

तुषारकाणिं त्या तनु थरथरली
पुलकीं गीतावलि झंकरली
निद्रालस मम नयनिं कालचें चित्र बिंबुनी झिळमिळलें
साजणि, जागविलें ४

पीन उरोजीं मम शिर घेउनि
बसलिस गालीं गाल टेकुनी
मृदु हृदकंपन श्वसन ऊष्ण तव, धुंद निशींतिल आठवले
साजणि, जागविलें ५

आलिंगनिं त्या मला मिळाली
ऊब युगाची जीवनांतली
अनुक्त गीतांतले ताल मज तव हृत्कंपनिं सांपडले
साजणि, जागविलें ६

अतां उभी तूं नव सुमनापरि
घेउनिया फल बीज अंतरीं
दार लवें मम कल्पवल्लिनीं, फळें बनुनि क्षण टपटपले !
साजणि, जागविलें ७

ध्रुबवेल, १२-१-४१

# पाषाण आणि मूर्तिकार

अभंग

**पाषाण—**

“माझ्या मूर्तिकारा, स्तब्ध बैसलास
शीण कां जिवास फार झाला ? १
हातावेगळीं हीं हत्यारें केलीस
काय शंकाभास मनीं येई ? २
पाहतोस काय स्थीर लोचनांनीं
तूं टक लावोनी माझ्याकडे ? ३
जाणशीं पाषाण मी तों तुझ्यापुढां
सर्वांगीं वाकुडा कठिण कीं ४
रूप माझें सारें तुझ्याच स्वाधीन
म्हणशीं तें पूर्ण नटेन मी ५
कल्पनेंत लीन तुझ्या या डोळ्यांत
निगूढ छायांत पापण्यांच्या ६
कोण जी खिवली, खेळली, हिंडली
हांसली, रंगली अश्रुहास्यीं ७
कलावंता, देईं मातें रूप वेष
तिचाच निःशेष आवडीचा ८
चालूं दे हातोडा तडावरी तडा
पडूं दे कडाडा माझ्या अंगीं ९
त्याच तड्यांतून तुझी ध्येय मूर्ति
येइल वरती एक दिनीं १०

त्याच आनंदानें उडत्या चिपांत
        राहतों हांसत सारखा मी ११
छिन्न भिन्न माझ्या देहाच्या राशींत
        देवि ती हांसत उभी व्हावी १२
हीच तुझी माझी एक जीवनाशा
        गोड स्नेहपाशा गळां घाली" १३

**मूर्तिकार—**

"त्याच आशेनें रे डोळ्यांतली ज्योत
        राहिली तेवत आजवरी १४
परि आज नेत्रां कैशी झाली गति
        कुठें ध्यानमूर्ति दिसेना ती १५
घडवाया जिची बैसलों मी मूर्ति
        उठून जाय ती अंतरींची १६
जिच्यासाठीं सृष्टि कलेची ही केली
        तीच अशी गेली पुढोनिया १७
कुणाचें मी रूप देऊं तुला आतां
        पाषाण मी स्वता झालों असे १८
घ्या हो कुणी माझीं हत्यारें हीं सारीं
        घाव माझ्यावरी घाला ऐसे— १९
माझ्यांतून घडे तीच दिव्यमूर्ति
        जिचा ध्यास चित्तीं घेतला मी" २०

हैदराबाद, २६-१-३४

# मनिंचे हेत राहिले

जाति—पुंडरीक

मनिंचे हेत राहिले
स्फुरून भाव जिरले नी श्वास राहिले
मिळत चार पाउलांत
सांगातीं जरि पथांत
एकाकीपण मनिचें क्षण न मोडलें  मनिंचे हेत राहिले
आलिंगनिं तनु कवळी
अधर-सुधा चुंबियली
सौंदर्य न मीलनांत अजुन स्पर्शलें  मनिंचे हेत राहिले
कविता आजन्म लिहिलि
रसिकसभा डोलविली
जीवनांत नच कधिं परि काव्य उमटलें  मनिंचे हेत राहिले
पंख तनूचे उपटुन
काट्यांवर नीड रचुन
हृदय-पांखरूं न आंत शांत झोंपलें  मनिंचे हेत राहिले
बहरली अनारकली
धुंदी क्षणिं क्षणिं भरली
परि जीवन रसरस डाळिंब तडकलें !  मनिंचें हेत राहिले.

१२ फेब्रु. ३८

# पारखें माझें मला

**गजल—पांढव्व**

[ गीतकाराची आत्मकथा ]

गीत गाभाऱ्यांत माझें भावमंथर चाललें
मी उभा दारीं परंतू, द्वारपालें लोटिलें
पूजना मीं हीं, पुजाऱ्या, आणिलीं माळा-फुलें
राहिलीं शेल्यांत अंतीं कंटकांचीं कां सलें !

सूर-मंडल भोंवता डोलें सभा कां स्तंभहि
सूरनिर्माता परी हा बाहिरोनी तळमळे
बोलती त्या गीत-रंगीं शैल मूर्ति विर्घळे
ठेंच मार्गीची चुकेना हाय, माझी त्यामुळें

भाव माझे, गान माझें पारखें माझें मला
शेवटीं अश्रूच माझे !— तेही गालीं वाळले !

आगस्ट ३७

## तव नयन मुलायम हलले

तव नयन मुलायम हलले ग
हृदयभाव फुलले कीं दडले कांहिं न पुरतें कळलें
झुरेबावरे भुरके डोळे
पलकांच्या छायांत तळपले
स्वप्न एक मधिं झळकुनि गेलें
चंचल जललहरींना बुजुनी मीन काय परतले, ग १

स्मृती पापण्यांवर थरथरली
असफल मीलनतृषा हांसली
स्मितें न कळतां तों दंहिवरलीं
व्याकुळतेनें मादक मदिरा अधिक नयनिं फेंसळे ग २

बोलुनि शिणलों, हृदय न भरलें
अंतरंग अकथितची उरलें
अतां मुकेपणिं विश्व दाटलें
विष अमृत तव सद्गद कंठीं एकमेळिं हिसळलें ग
तव नयन मुलायम हलले. ३

औरंगाबाद, २१-१०-४२

# मेंदीचीं पानें

जाति—चंद्रकला

पंथच मज ठावा नसे मज ठाव गांव जाया
परी निघालों मी यावया परत न या ठाया
उडे धुकें क्षितिजीं मुग्धतेपरि तुझ्या गहिरें
अन् विश्वात्माच्या तिमिर संकोचापरि पसरे
पैल हंसे तारा सांडतें तेज गूढ कांहीं
परि तव नयनाची, राजसे, ओढ त्यांत नाहीं
मज करूं द्या घाई सांजलें इथेंच निघतांना
दार लागलेलें तुझें दे निरोप जातांना
रक्त नसांतोनी उफळलें ऊष्ण झऱ्यावाणी
शद्ब कधि न फुटला लोचनीं आधण सांडोनी
स्तब्ध राहिली ही थरारुनि पुलकावलि देहीं
लाख जिभांचें या गीत कधिं झंकरलें नाहीं
काय वदूं आतां बोललों जे न आजवरती
मेंदीचीं पानें ठेविलीं बघ मेजावरती
हृदयरंग दडले तयाचे हिरव्या रंगांत
हृदय शोध माझें वाटलें तर या पानांत
जिवा उधळल्या या जाचते झांकण ही काया
पंथच मज ठावा नसे मज गांवठाव जाया

एप्रिल ४०

# घाटावर

छंद—देवीकर

लगबग चढे घाट नार निथळे पाण्यानं
भरज्वानीचं कणिस चाले भिजून मधानं १

शिरीं कळशी, चालते कोण गुलाबी नेसून
नार नागिण गव्हाळी चाले गुलालीं न्हाऊन २

हातीं पूजाताट डोले, चंदेरीची सळसळ
कांपे ज्वानीच्या वाऱ्यानं चांदण्याचं केळफूल ३

कोण प्रदक्षणा करी नदीपारीं, कडे तान्हं
सुगी धरणीबाईची लखडली मोतियानं ४

अंगी भूतां, शिळेभोंतीं लाट भिरीं नाचते
तिला आठवे घरांत बाळ झोपेत हांसतें ५

बेळग, १-११-४६

# रात्रीं आणि आतां

छंद–देवीवर

राया, तुझें रूप रातीं सांठविलें नेत्रांतून
फुटे पहांट क्षितिजीं जाय चांदणें सांडून
नाहीं कळला हिंवाळा तुझ्या मिठीच्या महालीं
ज्यानि जाईची सकाळीं दंहिवरें कांकडली
उशीवरी निश्वासांनीं गेंद गुलाबी फुलले
गेल्या पाकळ्या गळून सल उरांत उरले
तुझीं नखक्षतें, रात्रीं माझ्या उरीं फुलें झालीं
सडा प्राजक्ताचा दिनीं तुडविला पायदळीं
एक्या उशीं बोलतांना रात आली हुरड्यास
सारी लटकी साखर सकाळतां जोंधळ्यांस
राज्य भोगिलें पृथ्वीचें तुझ्या उघड्या बाहूंत
उन्हें पसरतां खालीं सुके धरणीचे ओठ

पैठण, १-११-४६

## लोटूं दे मज दार

जाति–कोकिळा

लोटूं दे मज दार
तरुणा, लोटूं दे मज दार
येथुनीच जा परत, राजसा, चुरड न पदराकिनार
वळवाची सर गेली पडुनी
अंग कसनसें गार झुळुकिंनीं
व्याकुळ करितो जिवा दडपुनी कुब्रट भिजट अंधार
तरुणा, लोटूं दे मज दार १

पहा न रोखुनि लालस नयनीं
पदर गळे हा हृदयधडकिंनीं
अचपळ नेत्रीं तुझ्या सांडते तृषा किती अनिवार
तरुणा, लोटूं दे मज दार २

मिळेल तुज नच येथें प्रीति
मांसें मांडिलिं स्वरूपहाटीं
प्रीतीचीं अग्नि मढीं कोरिलीं, भवंति श्वान-भुंकार
तरुणा, लोटूं दे मज दार ३

शेज मलिन चुरडिली पसरली
जणुं नागिणि वरि कातच आली
ऊष्ण श्वासें तुझा फुलोरा करपवील ती पार
तरुणा, लोटूं दे मज दार ४

नको आवळूं काया कवळी
ही फुसफुसते धामिण पिवळी
चुंबनरेखा उठेल तवमुखिं बनुनी जहर निखार
तरुणा, लोटूं दे मज दार ५

कुठल्यातरि अज्ञात गवाक्षीं
सखी जिवाची तुजला लक्षी
तिला नजर कर पाहिला वहिला तव यौवन-उपहार
तरुणा, लोटूं दे मज दार ६

ओळख-छे, तूं विसरुनि मज चल
मृत्यूनंतर तुझ्या पथावर
उन्हांत छाया करिन तुजवरी होऊनि नकळत घार
तरुणा, लोटूं दे मज दार ७

जून ४२

## विषकन्या

जाति–अंजनी

( 'लोटूं दे मज दार' या कवितेचें अन्य दर्शन )

आग जगा लावीन आज मी
करीन म्हटलें मी दोघांचे
दिवस उद्यांचे सुमनदलांचे
फूलच माझें परि कुस्करिलें फसवुनि रात्रींतून
आग जगा लावीन १

घर होतें मज हवें सानुलें
धनी प्रीतिचा, चिमणी बाळें
प्रीतीची पडशाळा केलें परि मज लज्जाहीन
आग जगा लावीन २

भुकेस पशुंच्या मी बळि पडलें
लाज काय मज वसन न उरलें
फिरे वासना पिशाच्च माझें निज जखमा चाटीत
आग जगा लावीन ३

रोग-वेदना मम तनु जाळी
तांबारे ही नवति गव्हाळी
तारुण्याच्या फुलां वसंता तीच कीड लावीन
आग जगा लावीन ४

तरुण धुंद निजसुखांत चाले
बाळासह कुणि रमणी खेळे
जाइजुईची दुनिया त्यांची करपवून टाकीन
आग जगा लावीन ५

बहर फुलांचा मला न बघवे
मधुर चांदणी रात न सहवे
चांदण्यांत पुष्पांत दंवांतुनि विषकीटक पेरीन
आग जगा लावीन ६

कंपिताधरीं गीत उमललें
असलें माझें जीवन विकलें
ह्या सौदागर जगा ईश्वरा लिलावांत फुंकीन
आग जगा लावीन ७

वेश्या कुलटा जगांत ठरलें
पुरुष कसे निष्कलंक उरले
विषकन्या मी अधरचुंबनीं देवदैत्य जाळीन !
आग जगा लावीन ८

औरंगाबाद, १-३-४७

# रसभरा

जाति—गंगा

तूं बैस अशी रसभरा, माशिं भिडवुनि डोळा जरा
तव नजर अशी या लोचनांत बिंबते
जणुं मदिर चांदणें प्रथम भूस स्पर्शतें
मधु कुसुमगंधिं कीं दिशाचक्र धुंदतें—
चुंबिता वसंतें धरा तूं बैस अशी रसभरा १

फळ रसाळ मन हें गानें ओथंबतें
परि सवेंच ही वेदना मना टोंचते
फळ फोडाया हें कुठें रसिक चोंच ते?
तुजविणें न ये रस भरा तूं बैस अशी रसभरा २

तूं उबगशील परि बस सखये, तोंवरी
मम थकली दृष्टी थिजेल ही लौकरी
मग जातांना, जा, सांगुन खोटें जरी
"मी बसलें हं शाहिरा!" तूं बैस अशी रसभरा ३

हेमंतपवनसम अखंड मग गाइन,
कधिं वसंत येईल चिंता नच ही क्षण,
पिकलेलीं पानें हीं सारीं उडविन!
टाकील कात मग धरा! तूं बैस अशी रसभरा ४

हिवायतसागर, १९-२-३७

## रुबाया—

जाति—द्राक्षकन्या

पानांचे पिकल्या विकट चाळ लेवून
ये तुफान वाता, गर्जत तिमिरांतून
विझविशील सहजचि झोपडींतल्या पणती
नक्षत्रदीप पण पहा कधीं फुंकून

*

रे, शेतकऱ्या, थांबवी तिफण थांबव ती
अन् सांडुं नको ते मोती-दाणे पुढती
तमिं नक्षत्रांपरि असें कांहितरि पेर
सिंहासन-मुकुटें कणसांमधुनि पिकती !

*

जणुं अधरबिंब ! अधीच चंद्र वर आला
गिरि तळांतुनी अंधार सांचला-हलला
जळजळत उसळलें काळकूट जें क्षितिजीं—
प्यायास काय तें अधर शिवाचा लवला !

*

किंचाळत खचतें नभ, कीं खरते धरणी !
कुणि कळा देत आक्रोशे तमिं तनु पिळुनी
ये गर्भ-कमल फोडून उसळुनी रुधिर
नवजीवन प्रगटे क्रंदत रक्तपथांनीं !

अर्धेच राहिलें गातां गातां गान
ती झोंपे टाकुनि मम खांद्यावरि मान
    निद्रेंत हंसे ती जसें चांदणें कललें
विश्रब्ध स्मिर्ति त्या गीत होय अन् पूर्ण

*

नव जीव जन्मतां हर्ष घरादारांशीं
नव जीवन ये कां त्याने जीर्ण जगाशीं ?
    कंटाळवाणि जर पुनरावृत्तिच नुसती
कां व्यर्थ खेळतो विधि जीवन-शक्तीशीं ?

*

गातोस मानवा, आशागीत कशाचें ?
नव विश्व तुझें नच येथें प्रकटायाचें
    रवि-गोल कधिं तरी पडला, विझला, मेला—
ही धरणी-छे ! छे ! थडगें त्या सूर्याचें !

*

वर्षतात उल्कापुलें निळाईतून
जणुं पारिजात निज अग्नि-देंठ घेऊन
    क्षणकांति हंसे ती शिलीभूत होतांना—
अमरता हीच क्या शद्बांनीं पाहून

माधुरी सांगुं कशि मधु-घोटाची बाले
चुंबनापरी तव जी अधरीं रेंगाळे
    तें स्पर्शन दाहक तव आतुर अधरांचें
अन् दंश नागिणी उत्कट त्यांत मिळाले

*

निष्पर्ण नाचती शाखा, चांफा डोले—
जणुं दग्ध अनंगचि अस्थिशेष हा हाले !
    जंव शाखाशिखरीं फुलें फुलतीं एकेक
प्रीतिचें अपर्णा-तप तें कुसुमित झालें !

*

पापाचा म्हणशीं उतरायातें भार
घेतोस प्रभो, तूं युगींयुगीं अवतार
    परि पाप नवें ये नव अवतारासंगें
मग धर्मस्थापन कसलें ? कां बडिवार ?

*

धर्मास्तव किति हें सांडें रक्त पहाना
ये शोणितदर्पचि कर्पट या स्वर्भुवना
    रक्तानें भिजलीं वस्त्रें ईश्वरतेचीं
प्रेषित तव आणिक तूंहि खुनी भगवाना !

म्हणतात नभांतुनि शद्ब येइ जन्मास
मी शद्बांमधुनी निर्मिन नव आकाश
    तपतील उद्यांचे कोटिसूर्य या गगनीं
मी हंसेन तेव्हां नीलिमेंत मरणास

*

नाचांत थकुनिया बसतां तूं, वेल्हाळे,
नवतिचा ऊर तव श्वासें पदरीं हाले
    फडफडुनि शोधिती पंछि उरींचे नीड
काहली वाढविशि कां पिउनी मधुप्याले ?

*

कर्मानुसार जर मिळणें फळ आम्हांला
मग तुझी दलाली देवा, मधिंच कशाला ?
    गणनाच करित तूं रहा पापपुण्याची;
पतनींहि करूं अम्ही सुंदर मानवतेला

*

जो जसा तुजकडे येइ तसा त्या भजशी
पुरुषार्थ कोणता प्रभो, यांत मिरवीशी ?
    तुजहुनी बरे हे मनुज जुलुम साहून—
निजशूल वाहुनी नेति वधस्थानाशीं

केलीस तूंच ना कथा सुरू वद राणी
मग थांबलीस कां? नीज दाटली नयनीं
चांदणें उसासें मुकें खिन्न क्षितिजांत
अर्धीच राहणें कां ही रात-कहाणी?

*

मारिली जयानें हरिच्या हृदयीं लाथ
त्या भृगुलत्तेचें मी विप्लव-उत्पात!
तेव्हांच हदरले विष्णुलोक कैलास
कोसळतिल आतां सत्तांधाचे तख्त

*

"तारुण्य दिलें जरि ययातीस पुत्रांनीं
तें सरलें" कविता वदे स्वप्नि मम हंसुनी
"परि तुला मानवा, चिरयौवन देइन मी
जें न ढळें, न सुकें, युगें जाति जरि निघुनी"

*

पडतांच मृगाचे थेंब उठे बेबंद—
तापल्या धरणिचा हा उन्मद मृद्‌गंध
हा श्वास, उद्यांची आस अन्नदेवाची
स्पंदते तोडुनी मातीचे कण-बंध

मज ओढ तुझी, पाहिलें जरि न तुज अजुनि
अज्ञात फळाचा फुला ध्यास दिनरजनी
चाललें सुकत हें फूल गळाल्यावरती—
येशील काय तूं फळापरी रसरसुनी !

*

खळखळत नदीच्या फेनिल लहरींवाणी
गीतांनों, जातां कुठें हृदय सोडोनी
तुम्हि असीम अंबर पुलकित काय कराल,
कीं निगूढ काळा रोमांचित स्पर्शांनीं ?

*

तुम्हि-अम्ही गाइलीं मिळुनि नवनवीं गाणीं
वाटलें नवी गति दिली प्रहां छंदांनीं
संपली रात,रवि उगवे पूर्वेलाच !
मग कळलें,फिरलों स्वतांच अम्हि गुंगोनी !

*

हिसळतां हृदय हें मधुकण कांहीं पडले
मधुकुंभ तयानें रसिका, तव हे भरिले
कल्पना न राचे परि त्यावर मग हृदयाची
पिउनिही हलाहल जें अमृतें मोहळलें !

## मायभाषेस

वृत्त—मंदारमाला

मातेचिया गोड दुग्धामृताची सवै आमुची तोडिल्यापासुनी
तुझ्याच दुग्धावरी मायभाषे, अम्ही वाढलों पोषलें जीवनीं।
तें दूध अंगांतुनी गर्जताहे झळाळे विजांची प्रभा त्यांतुनी
या पारतंत्रीं अजूनी न मेलीं मनें आमुची, या पहा डोचुनी १

गोदा गभीरा निळी गूढ कृष्णा खळाळे तुझ्या काव्य गीतांतुनी
स्वातंत्र्य हुंकारतें तें अजूनी तुझ्या ह्या खड्या माळबोलींतुनी
देवत्व द्यावें तुवां फत्तराला तुझी थोरवी ही वदे पंढरी
टाकीत येशी चुळा अमृताच्या भराया नवे प्राण देशांतरीं २

माते, मराठे तुझे पुत्र आम्ही तुझी मृत्तिका नामरूपावते
गाणीं तुला गावया, पूजकाचें हृदीं रक्त हेलावतें वाहतें
बंदी अशा गायनातें करोनी गळे आमुचे कापिलें हे तरी—
गातील गाणीं मराठीं कबंधें मराठी खुल्या माळरानावरी ३

हिमायतसागर, २०-१२-३४

# शुद्धिपत्र

जेथें अर्थ विपर्यास होईल अशाच स्थळांचें तेवढें शुद्धिपत्र दिलें आहे.

| गान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ३ | १ | अडखळुनि | अडखळुनी |
| ३ | ११ | बुद्धिशाली | बुद्धिशालि |
| १९ | ३ | मऊ | मउ |
| २० | ४ | येथील | जेथील |
| २२ | ८ | निज | तिज |
| २३ | ५ | जीवा | जिवा |
| २३ | ७ | चित्रकारांचीं | चित्रकरांचीं |
| २६ | १२ | वीटतील | विटतील |
| २७ | २ | यादवगरूडध्वज | यादवगरुडध्वज |
| ३३ | ३ | पायीं | पायिं |
| ३४ | १० | द्या अर्घ्य तिला द्या | अर्घ्य तिला द्या |
| ३९ | ६ | भरूं | भरुं |
| ४२ | ५ | उत्रेमाधिं | उप्रेमधिं |
| ४३ | २ | वरूं | वरुं |
| ४४ | ३ | नादशद्ध-पंक्तींत | नाद शद्ध-पंक्तींत |
| ४६ | १६ | चवका | चकवा |
| ५३ | २ | बाण संगतींच | बाणसंगतींच |
| ५३ | १३ | रूतला | रुतला |
| ५९ | ६ | तह्यानेल्यांनीं | तान्हेल्यांनीं |
| ६० | १८ | शेवाळांतून | शेवाळांतुन |
| ६० | १९ | पिउनी | पिऊनी |
| ६१ | ११ | कोंठुनी | कोठुनी |
| ६२ | ३ | कपोत बाळें | कपोतबाळें |
| ७० | १५ | स्वातंत्र्य तिलक | स्वातंत्र्यातिलक |

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
| --- | --- | --- | --- |
| ७४ | २ | नवारूण | नवारुण |
| ७४ | ११ | मृद्‌गंध धुंदिमाधिं | मृद्‌गंधधुंदिमधिं |
| ७७ | ७ | तरी | तरि |
| ८१ | १६ | घडकी मधुनी | घडकीमधुनी |
| ८६ | १९ | थापे सरसीं | थापेसरसीं |
| ९३ | ४ | हास्यश्रूंना | हास्याश्रूंना |
| ९३ | ४ | आशा स्मृतिंना | आशास्मृतिंना |
| ९३ | ६ | ज्वलन तेज | ज्वलनतेज |
| ९७ | ८ | तरंगीणी | तरंगिणी |
| ९८ | १३ | गायन लहरींनीं | गायनलहरींनी |
| ९९ | ३ | करूनी | करुनी |
| १०२ | ११ | जादू-टोणे | जादूटोणे |
| १०५ | ५ | उन्हवादळीं | ऊन्हवादळीं |
| १०६ | १४ | वेदिं तु न | वेदिंतुन |
| १०८ | ७ | हृदकंपन | हृत्कंपन |
| १०८ | १४ | फल बीज | फलबीज |
| ११४ | ९ | उफळलें | उसळलें |
| ११४ | १५ | तयाचे | तयाच्या |
| ११६ | ८ | दिनीं | दिनें |
| ११८ | २ | नागिणि वरि | नागिणिवरि |
| ११९ | १३ | वासना पिशाच्च | वासनापिशाच्च |
| १२२ | ९ | अधींच | अर्धांच |
| १२२ | १० | गिरि तळांतुनी | गिरितळांतुनी |
| १२४ | ७ | फुलतीं | फुलतिं |
| १२४ | ८ | तें | कीं |
| १२८ | २ | तुझ्याच | तूझ्याच |
| १२८ | ४ | पारतंत्रीं | पारतंत्र्यीं |
| १२८ | ५ | काव्य गीतांतुनी | काव्यगीतांतुनी |